# माझ्या कलेसाठीं

: लेखक :

भा. वि. वरेरकर

किंमत १ रुपया.

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशनसंस्था मुंबई नं. ४

# नान्दी

सामाजिक जीवनाच्या अनेक प्रवाहांवर अनेक नाटककारांनीं अनेकदां प्रहार केले, किरण पाडले, तरफदारी केली किंवा प्रवाहांत वाहून गेले, परंतु चित्रकला हा सामाजिक जीवनाचा महत्त्वाचा प्रवाह असून अद्याप कोणी तो हाताळला नव्हता. एकाद्या खंद्या नाटककारानें पुढें येऊन हा विषय घ्यावा व कलेवर, तसेच समाजावर थेट किरण पाडावे, ही माझी अनेक वर्षांपूर्वीची इच्छा सुदैवानें स्वाभिमानी विख्यात नाटककार श्री. मामा वरेरकर यांनीं स्वयंस्फूर्तीनें 'माझ्या कलेसाठीं' हें नाटक लिहून तृप्त केली याबद्दल त्यांना धन्यवाद देणें हें माझें पहिलें कर्तव्य मीं समजतों.

या व्यापारी जगांत कलावंतांच्या कलेचा आणि त्यांच्या जीवनाचा कसा मारवाडी बाजार होऊन बसला आहे, याची जाणीव समाजाला नाहीं. इतकेंच काय, फारच थोड्या कलावंतांना आहे! उच्च आणि स्वतंत्र कलाकृतीच्या निर्मितीला कलावंत सर्वस्वी असमर्थ, म्हणून अपात्र ठरला आहे. कलाकृतीला बाजारभाव काय येईल या अंतस्थ हेतूपलीकडे कलाकाराचें मन आणि हात वळत नाहींत. कारण एकच—प्रत्येकाला संसारी बनून रहाण्याचा हव्यास असतो, सामान्य जनतेच्या सामाजिक बंधनानें आंखलेला प्रतिष्ठितपणा कमावावासा वाटतो. कलावंताची भूमिका, स्वभाव व ध्येय दाबून ठेवून, कृत्रिम जीवनाच्या फेऱ्यांत गुरफटून घेऊन, नुसतें पोटभरण्यापलीकडे जाऊं शकत नाहीं आणि अशा रीतीनें तो व्यापारी-जगाचा घटक बनतो. खरा कलावंत समाजाला मार्गदर्शक असतो, समाज त्याला मार्गदर्शक होऊं शकत नाहीं, ही वस्तुस्थिती मामांनीं सुंदरराव या कलाकाराच्या भूमिकेद्वारें स्पष्ट केली आहे.

सुंदररावाचीं चित्रें प्रदर्शन-समीतीनें फेकून दिलीं—हे प्रकार कलावंतांच्या चांगले ओळखीचे आहेत. वास्तविक कलासंस्थांचीं प्रदर्शनें व्यापारी कलेसाठीं नसावींत. व्यापाऱ्यांनीं भरविलेल्या प्रदर्शनांत व्यापारी कलेचा प्रवेश ठीक आहे. परंतु उच्च कलेचा मंत्र आणि तंत्र दाखविण्यांत उच्चांक कोणी गांठला हें जनतेच्या

नजरेला आणणें हें कलासंस्थांचें धोरण असलें पाहिजे. परंतु दुर्दैवानें कलासंस्था आणि कलावंत यांची व्यापारी वृत्ती ठाम बनून राहिल्यामुळें उच्च कलेला गचांडी मिळण्याजोगे प्रकार तेथें होऊं शकतात. सुंदरराव मंदेला सांगतों, ' तूं माझ्याकडे शिकायला येऊं नको. सरकारी कलामंदिरांत जा. ' तेव्हां मंदा म्हणते, ' मला सरकारी कलामंदिरांत जाऊन ड्रॉइंग मास्तर व्हायचें नाहीं. ' त्या मुलीचें हें उत्तर अत्यंत समर्पक आहे. अशीच सध्यांची खरी स्थिती आहे. कलावंत होण्याच्या लायकीचें शिक्षण सरकारी कलामंदिरांत मिळूंच शकत नाहीं. सरकारी कलाशिक्षण संस्था यावेळीं तर सर्वस्वी व्यापारी कलेच्या आहारीं गेली आहे. पोटभरू कलावंत बनविण्याचा तो एक कारखाना बनला आहे. उच्च कला, राष्ट्रीय भावना व स्वतंत्र विचार हे ठार मारण्याचा बुद्धीपुरस्सर प्रयत्न तेथें केला जात आहे. याचें कारण एकच—सरकार ती संस्था हिंदी कलाकारांच्या नियंत्रणाखालीं जाऊं देत नाहीं. परकीय लोकांच्या नियंत्रणाखालीं चाललेलें शिक्षण, गुलामी वृत्तीचेच कलाकार निर्माण करण्यापलीकडे कांहीं करूं शकणार नाहीं. ही आपत्ती मंदेच्या " ड्राईंग मास्तर व्हायचें नाहीं मला ! " या एका उत्तरानें उघड केली आहे.

स्त्री आणि पुरुष या भावनेचा भेद माणूसकीला कसा आड येतो हें रजनीच्या तोंडानें वदवून सुंदररावाच्या डोळयांत मामांनीं चांगलें अंजन घातलें आहे. हें अंजन डोळयांत पडल्यावर ' आदि-माणूस ' ही कल्पना सुंदररावाच्या डोक्यांत आली आणि शिंगें, दाढीमिशा, स्तन आणि शेपटी असलेला माणूस त्यानें निर्माण केला. माणूस या संज्ञेला पात्र अशा माणसाचे मुख्य गुण एकत्र करून त्याला प्रतीकात्मक आकार देऊन सुंदररावानें जें चित्र केलें तें उच्च कलेचें द्योतक ठरतें. प्रतीकात्मक पद्धति ही आमच्या हिंदी कलेचें वैशिष्ट्य आहे. आम्हां कलावंतांना पाश्चात्य कलाशिक्षणानें डोळयाला दिसणाऱ्या निसर्गाचें अनुकरण करण्यापलीकडे कांहीं कळत नाहीं. आम्हां कलावंताचें बौद्धिक सामर्थ्य खच्ची करून टाकलें गेलें आहे. आणि म्हणूनच सुंदररावांचें

'माणूस' हें चित्र उच्च कलेंत जमा आहे, याची जाणीव फारच थोड्या कलावंताना पटेल. सामान्य जनतेला तर तो वेडेपणाच वाटेल. असले प्रसंग रंगभूमीच्या द्वारें जनतेपुढें येतील तितकी लोकशिक्षणाला फार मदत होईल यांत शंका नाहीं.

खऱ्या कलेचा संसार सोडून समाजमान्य संसार थाटणें म्हणजे कलाकारानें दोन बायकांचा दादला होणें आहे. कलावंताचें त्याच्या कलेशीं जन्मतःच लग्न लागलेलें असतें. त्यानंतर समाजामध्यें विश्वास व मानमरातब मिळविण्यासाठीं लग्न करून तो संसार करणें म्हणजे स्वतःला उच्च कलानिर्मितीस नालायक करून घेणें आहे. हें सत्य 'माझ्या कलेसाठीं' या नाटकानें उघड केलें आहे. कला ही एकच बायको व कलाकृती हा परिवार समजून जो कलावंत स्वतःला वाहून घेईल तोच श्रेष्ठ कलाकृतींची निर्मिती करुं शकेल. असे कलावंत पुढें येतील त्याच वेळीं कलेच्या विकासाची आशा वाटूं लागेल. अशा प्रकारें दोन बायकांचा दादला होऊन उच्च कलाकृति निर्माण होणें अगदींच अशक्य आहे असें मला म्हणायचें नाहीं, परंतु ते दुरापास्त आहे खास. असा कलाकार शंभरांत एक तरी मिळेल कीं नाहीं याची शंका आहे. एकादा यदाकदाचित असला तर त्याच्या कलेच्या आयुष्याचा आठवा हिस्सा सुद्धां खऱ्या कलेसाठीं खर्ची पडणार नाहीं. कलाकार हा 'सामान्य' माणूस नव्हे—'असामान्य' व्यक्तींचें चारित्र्य सामान्याशीं तुलनीय होऊं शकत नाहीं.

आमची गुलामी वृत्ति इतक्या पराकोटीला पोंचली आहे कीं, कलाकार आपल्या कलेची महती समाजाला समजावून देतांना कोठल्या तरी फडतूस युरोपियनाच्या सर्टिफिकेटाचें किंवा शिफारशीचें रसभरीत वर्णन केल्याशिवाय ती पुरी करीत नाहीं. तसेंच समाजाचेंही आहे. हा कलाकार श्रेष्ठ कीं कनिष्ठ हें समजावून घेण्यासाठीं युरोपियनांचा सल्ला घेईल तेव्हांच समाजाचेंही समाधान होतें. कलाकार यूरोपमधें जाऊन त्याच्याबद्दल चार ओळी वर्तमानपत्रांत वाचतील तेव्हांच ते त्या कलाकाराची दाद घेतील. परदेशची पदवी हें तर कलावंतांना बहुमोल हत्यार

वाटतें. आणि समाजाला कलावंताची पदवी हीच कला वाटते. F. R. S. A. या पदवीच्या प्रसंगाच्या निमित्तानें, जनतेच्या आणि कलाकारांच्या नजरेंत कसा गैरसमज भरला आहे, हें चांगलेंच दाखवून दिलें आहे. Royal Society of Arts (London) या सोसायटीबद्दल अद्याप कित्येक कलाकारांत गैरसमज आहे. त्या सोसायटीचा फेलो ( मेंबर ) होणें हा एक मोठा मान आहे असें अनेक खुळे कलाकार समजतात. परंतु खरी गोष्ट अशी आहे कीं, Bombay art Society आणि Art Society of India या संस्थांचा मेंबर होणें जितकें सोपें आणि मानाचें आहे त्यापेक्षां Royal Society of art चा सभासद होणें हें अधिक महत्त्वाचें नाहीं. उद्यां जर M. B. A. S. ही पदवी बॉंबे आर्ट सोसायटी, किंवा M. A. S. I. ही पदवी आर्ट सोसायटी ऑफ इंडिया या संस्थेनें २५ रु. फी ठेवून सुरू केली तर हे F. R. A. S. चे शोकीन फी भरायला तयार होतील कीं नाहीं याची शंका आहे. तीन गिनी तेथें पाठी लागून भरतील पण २५ रु. विनंती करून मागितले तरी देणार नाहींत. या असल्या दुबळ्या वृत्तीवर "कृष्णा डेमा रामगडा–फेलो ऑफ रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्स्" या गड्याकडून या प्रकरणावर चांगला प्रकाश पाडला गेला आहे.

'माझ्या कलेसाठीं' या मामांच्या नाटकाचें सार असें आहे कीं, जन्मजात कलाकार गुलामगिरी, परंपरा, अनुकरण, प्रतिष्ठा आणि कृत्रिम प्रेमपाश या रोगांपासून मुक्त असतो आणि स्वतःच्या स्वतंत्र कलेला जन्मभर वाहून घेत असतो. नाटकाचें कथानक वास्तवपूर्ण आहे, त्यामुळें विचारी कलाकाराला हें नाटक समाधान देईल अशी खात्री वाटते. कलेचा तात्त्विक आणि व्यवहारिक अभ्यास मॉमांनीं चांगलाच केला आहे हें या नाटकावरून सिद्ध होतें. कलेच्या प्रांतांत लक्ष घालून नाटककार या नात्यानें आपली हजेरी लावली याबद्दल मी मामांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

मुंबई–ताडदेव
ता. २९–८–४२

वि. पां. करमरकर

# प्रस्तावना

१९३९ सालच्या ऑगस्ट महिन्यांत हें नाटक लिहिलें गेलें. आर्ट सोसायटी ऑफ इंडिया या संस्थेकरतां, आणि त्या संस्थेच्या वतीनें, या नाटकाचा प्रयोग होणार होता. त्यावेळीं मुंबईतील प्रमुख आर्टिस्ट स्त्रीपुरुष या नाटकांत भूमिका घेणार होते आणि श्री. आळतेकर यांच्या नजरेखालीं चित्रकार हळदणकर यांच्या स्टुडिओंत त्याच्या तालमीही सुरू झाल्या होत्या. परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळें त्यावेळीं तें नाटक रंगभूमीवर आलें नाहीं. तरीही हें नाटक लिहिलें जाण्याचें सर्व श्रेय आर्ट सोसायटीचे प्रमुख सभासद श्री. नानासाहेब करमरकर आणि तात्यासाहेब डोंगरे यांना सर्वस्वी आहे.

तीन वर्षांनंतर आज हा प्रयोग रंगभूमीवर होत आहे. या प्रयोगानें 'लिट्ल् थिएटर' या संस्थेची मुहूर्तमेढ रोवली जात आहे आणि ती रोवण्याचें श्रेय नॅशनल थिएटर ॲकॅडेमीचे रेजिसर पार्श्वनाथ आळतेकर आणि त्यांचे सर्व विद्यार्थी आणि विद्यार्थिनी यांनाच आहे.

हाजीकासम वाडी,<br>
मुंबई.<br>
ता. ३ सप्टेंबर १९४२.

भा. वि. वरेरकर

ता. ५ सप्टेंबर १९४२ रोजीं रॉयल ऑपेरा हाऊस मुंबई, या नाटकगृहांत प्रस्तुत नाटकाचा प्रयोग नॅशनल थिएटर ॲकॅडेमीच्या खालील विद्यार्थी आणि विद्यार्थिनींनीं 'लिट्ल् थिएटर' च्या विद्यमानें करून दाखविलाः—

**कल्याणीः**—कांचनमाला शिरोडकर

**रमणीः**—कल्याणी नायमपल्ली

**रजनीः**—सिंधू गाडगीळ

**कुंदाः**—कमल फडणीस

**मंदाः**—सुशीला लोटलीकर

**सुंदर**—रामचंद्र वर्दे

**बाबुरावः**—वसंत गवाणकर

**बळवंतरावः**—गणेश चौधरी

**विश्वासरावः**—विराग

**कृष्णाः**—त्रिंबक गोखले

**कवीः**—सुंदर नायमपल्ली

**ऑथरः**—राजा बढे

**नटः**—पार्श्वनाथ आळतेकर

**संगीतः**—प्रो. बाळकृष्ण रघुनाथ देवधर

**ऑर्केस्ट्राः**—प्रो. देवधर यांचे स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक

**नेपथ्यरचनाः**—बाळकृष्ण राजे

---

# अंक पहिला

[ सुंदररावाचा स्टुडिओ—सर्वसामान्य कुणाही आर्टिस्टच्या स्टुडिओसारखा—ठिकठिकाणीं पुरींअपुरीं चित्रें लटकलेलीं किंवा घोड्यावर ठेवलेलीं—विद्यार्थ्यांसाठीं बसण्याचे 'डॉन्की' (बाकडीं)—मधुनमधून खुर्च्या अस्ताव्यस्तपणें ठेवलेल्या—एक कोच, स्टूलें—जमिनीवर कागदाचे कपटे व बोळे पडलेले—एका कोंपऱ्यांत एक रेडिओ सेट आहे. पडदा वर जातांच तिथें कुणी नाहीं. रेडिओ वाजत आहे. एक क्षणभरांत रजनी प्रवेश करते. रजनी ही सुंदररावाची एक विद्यार्थिनी आहे. पोषाख अलीकडील कुठल्याही विद्यार्थिनीसारखा पण त्यांत छानछोकपणा नाहीं—मुद्रा गंभीर—अकालीं पोक्तपणा आलेली एक प्रौढ मुलगी—इकडल्या तिकडल्या दारांतून पाहाते आणि 'कृष्णा-कृष्णा' म्हणून हांक मारते. कुणी ओ देत नाहींसें पाहून 'नाहीं वाटतं कुणीच घरांत!' असें आपल्याशींच पुटपुटत रेडिओजवळ ऐकत उभी राहाते. इतक्यांत रमणी प्रवेश करते आणि दचकून दाराजवळ थांबते—रमणी ही सुंदररावाची बहिण. पोषाख कोणत्याही कुटुंबवत्सल गृहिणीसारखा—बोलण्यांत लाडावलेली—पोक्त दिसत असून पोरकट असलेली एक आधुनिक गृहिणी—]

**रमणीः**—कोण ? रजनी ?—इकडे कुणीकडे आज ?

**रजनीः**—पाहायला आलें होतें—

**रमणीः**—कुणाला ? आतां कांहीं कुणाला पाहायची जरूर नाहीं तुला !

**रजनीः**—नाहीं. ज्यांनीं पहिल्यानं पाहिलं मला, त्यांनाच पाहायला आलें होतें. सुंदररावांकडे जातों म्हणून सांगितलं मला—

**रमणीः**—कुणी ? बाबुरावांनीं ?

**रजनीः**—हो. म्हटलं, आज ही लहर कां आली यांना? सुंदरराव म्हटलं, कीं पायाची तिडीक मस्तकाला जायची, त्यांना आज सुंदररावांचा एवढा कां पान्हा फुटला तेंच पाहायला आलें होतें. पण इथं कोण आहे?

**रमणीः**—मला वाटतं दादा इतक्यांत येईल. तिकडे प्रदर्शनाकडे गेलाय् वाटतं. आज निवड व्हायचीय् ना चित्रांची!

**रजनीः**—वशिला लावायला गेले आहेत वाटतं?

**रमणीः**—दादा न् वशिला? नांव घेऊं नकोस. प्राण गेला तरी कुणाकडे तोंड वेंगाडायचा नाहीं तो.

**रजनीः**—काय निवड झालीय् तें बघायला गेले असतील—तसं मला नक्की माहित नाहीं. आपलं नुसतं अंदाजानं म्हटलं मी.—काय झालंय् हल्लीं त्यांना कांहीं कळत नाहीं. कल्याणीलासुद्धां हल्लीं भेटत नाहींत.

**रमणीः**—तीच सांगत होती वाटतं?—तिचं काय ऐकतेस? श्रीमंताची पोर ती! आपणच जात असेल कुठं तरी भिंगऱ्या मारीत अन् हाच भेटला नाहीं म्हणून सांगत असेल. माझा नाहीं विश्वास बसत. सुंदरराव–अन् कल्याणीला भेटला नाहीं म्हणे!

**रजनीः**—बरं—अन् बळवंतराव नाहीं गेले वाटतं प्रदर्शनाकडे? चित्रं पाठवलीं आहेत ना?

**रमणीः**—अंः! त्यांना नाहीं कांहीं वाटत त्याचं! काय बक्षिसं न् पदकं मिळवायचीं तीं मिळवलीं आहेत. आतां आपलीं चित्रं पाठवायचीं म्हणून पाठवायचीं—एवढंच. पण खरंच—तूं किती पाठवलीं आहेस चित्रं?

**रजनीः**—हंः—माझं काय—बायकांच्या चित्रांना कोण देतोय किंमत?—

**रमणीः**—पुरुषांना विचार. ते म्हणतात, हल्लीं तुम्हीं बायकाच येतां आहां त्यांच्या बक्षिसाआड! चित्र हिडिस असलं तरी चित्र काढणारी सुंदर असली कीं झालं—हटकुन बक्षिस ठेवलेलं!

**रजनीः**—दुष्ट आहेत मेले! थांबा म्हणावं—चित्रकार व्हायला तुम्हां लोकांना दिखिल फार वेळ आहे.

**रमणीः**—मग—किती चित्रं पाठवलीं आहेस ?

**रजनीः**—खूप पाठवलीं आहेत—पण टांगतात किती तें पाहा-यचं !—मला कुठं त्याची पर्वा आहे म्हणा—पण यांचा जीव तळमळतो ना ? वाटतं, जसं कांहीं यांचंच चित्र—अस्से भांडतात कुणी माझ्या चित्राला नांवं ठेवलीं तर—

**रमणीः**—भाग्यवान आहेस !

**रजनीः**—कसलं भाग्य घेऊन बसली आहेस ? माझी तारीफ करतात ती काय माझ्यासाठीं असं वाटतं तुला ? अग मी ऐकत असतें—दुसऱ्या कुणाला सांगतात कीं जशा कांहीं त्यांच्याच कल्पना. मी आपली नुसती चितारी. हातांत हात धरून चित्रं काढवतों असं सांगत नाहींत, हेंच भाग्य म्हणायचं !

**रमणीः**—खरंच ?

**रजनीः**—आज पहिल्यानं धाव घेतली त्या हँगिंग कमिटीकडे. किती सांगितलं मी नको म्हणून—पण नाहीं—दुसऱ्यापुढं नाक घासायची आवड आहे ना ! नाहीं का मिळेना बक्षिस नि पदक—काय चाटायचीं आहेत तीं पदकं ? नि बक्षिस काय ? सहाशें रुपये ! हंः ! भिकारडे मेले !

**रमणीः**—तुला असं वाटतं घरीं गडगंज आहे म्हणून ! पण किती जणांचे डोळे असतात त्या सहाशांवर !—जन्माची बेगमी झालीशी वाटते त्यांना.

**रजनीः**—तें खरं आहे—पण मी म्हणतें या आमच्यांना कशाला या उठाठेवी ?

**रमणीः**—पुरुषाचा जीव—तळमळतो ना बायकोच्या कल्याणा-साठीं ? आम्हां बायकांना नाहीं कळायचं तें—( विश्वासराव येतो. एक जुन्या जमान्यांतील आर्टिस्ट-वय सुमारें ५५—रुमाल बांधणारा—उपरणें घेणारा—बोलतांना खांदे उडवण्याची संवय—हातीं सदासर्वकाळ एक छत्री—) या विश्वासराव, दादा कुठं आहे ?

**विश्वासः**—सुंदर होय ? कुठं दिसला नाहीं तिकडे—बरं झालं नाहीं आला तो—

**रजनीः**—कां ? काय झालं ?

**विश्वासः**—काय व्हायचं दुसरं ? गेल्या वर्षांची पुनरावृत्ती !
**रमणीः**—धुडकावलीं का सारीं चित्रं त्याचीं ?
**विश्वासः**—हट्ट बरं हा—हट्ट ! तरणं रक्त—सळसळतं. वाटतं, कीं मी जगाची उलथापालथ करीन. नव्हेच तें ! आमचं कोण ऐकतो ? म्हातारीं माणसं आम्हीं—मद्दड झालों असं वाटतं या तरण्या जवानांना. नव्हेच – नव्हेच तें !
**रजनीः**—काय झालं ? म्हाताऱ्यांनीं काय केला गुन्हा ?
**विश्वासः**—म्हाताऱ्यांनीं नव्हे—तरण्यांनीं. तीं काय चित्रं ! कधीं पाहिलीं होतीं कुणी असलीं चित्रं ? अरे जगांत काय कुठं सौंदर्यंच नाहीं ? उकिरडे कशाला उपसतात लेकाचे ? लोक काय मूर्ख आहेत असले उकिरडे पाहायला ?
**रमणीः**—काय झालं तें स्पष्ट सांगाल आतां ? क्षमा करा हं—माझा बहिणीचा जीव तळमळतो म्हणून विचारलं. काय झालं ?
**विश्वासः**—व्हायचं काय ? फेंकून दिलीं चित्रं !
**रमणीः**—दादाचीं चित्रं ?—एकसुद्धां निवडलं नाहीं ?
**विश्वासः**—एक सुद्धां चांगलं नव्हतं—मग कसं कोण निवडील ?
**रजनीः**—अन् माझीं ?
**विश्वासः**—सारीं पास ! एक जात—एक मतानं ! हिची अक्कल घे म्हणावं तुझ्या दादाला. मी म्हणतों, शाबास बाबुराव !
**रजनीः**—( रमणीला ) ऐक.
**विश्वासः**—काय ?
**रजनीः**—नाहीं म्हटलं—सुंदररावांना एकादा नवरा असता म्हणजे हें असं झालं नसतं.
**विश्वासः**—नवरा कीं बायको ?
**रमणीः**—बायको बिचारी काय करणार ? मुकं जनावर तें ! दिल्या दानाची नि घातल्या अन्नाची मालकीण !
**विश्वासः**—पण मालकीण तर आहे ना ?
**रजनीः**—मालकाची बायको म्हणून ! आतां ही रमणी—चित्रकाराची बायको—म्हणून का ही चित्रकार ठरायचीय ?
**विश्वासः**—मोठया असंतुष्ट असतां तुम्हीं बायका. कशानंच

समाधान होत नाहीं तुमचं. मोकळ्या सोडल्या तर म्हणतां आमची कुणी काळजी घेत नाहीं—अन् एवढीशी सत्ता गाजवली तर कान झाडूं लागतां ! पण तुझं बरं आहे रजनी—बाबुरावासारखा नवरा मिळायला भाग्य हवं.

**रजनी**:—ऐक रमणी !

**विश्वास**:—अरे हें काय ?

**रमणी**:—कोडं आहे हें विश्वासराव.

**विश्वास**:—तीन बायका केल्या आतांपर्यंत—पण आपल्याला कांहीं हें असलं कोडं कधीं पडलं नाहीं. एवढं बरं, त्यांत कुणी आर्टिस्ट नव्हती. तीन लग्न करून सुद्धां आतां या म्हातारपणीं फकीर होऊन रहायचं आलं आहे नशिबीं.—आणि तुम्हीं या अशा झगडतां ?

**रमणी**:—कोण झगडतं ?

**रजनी**:— कुणाशीं झगडलं कोण ?

**विश्वास**:—तुम्हीं—बायका—रोज झगडतां—नवऱ्यांशीं. अरे, आम्ही पुरुषपुरुष जमलों कीं याच गोष्टी बोलतों कीं नाहीं ?

**रजनी**:—तेवढंच सत्तेचं खेळणं आहे ना खेळवायला ?

**रमणी**:—दुसरे नसतात वाटतं कांहीं विषय ?

**विश्वास**:—आवडता विषय म्हणजे हाच !—अग, आम्हीं चित्रकारांनीं जर बायकांच्या गोष्टी बोलायच्या नाहीं तर दुसऱ्या कुणी ? बायकांच्या जिवावरच ना आमची कला जगली आहे ?—

**रजनी**:—खरं आहे—

**विश्वास**:—खरं आहेच मुळीं. बायकांच्या चित्राशिवाय कुठं आहे चित्राला बाजारभाव ?

**रजनी**:—म्हणून करतां का आमची विटंबना ?

**विश्वास**:—विटंबना ? काय वेड्या आहांत पोरींनों ! ही काय विटंबना ? जगाच्या बाजारांत जर बायकांची किंमत कुणी वाढवली असेल तर ती आम्ही चित्रकारांनीं—( बळवंतराव व बाबुराव येतात. दोघेही समवयस्क—साधारणपणें तिशीच्या आंतले—पोषाख आधुनिक, फारसा किंमतवान नसलेला—सदोदित उघड्या माथ्यानें फिरणारे—) या. या

**बळवंतराव**—या बाबुराव—आतां कसं ठीक जमलं. दोन्ही जोडपीं कशीं सुंदर जुळलीं आहेत !

**बाबुराव**:—मोठं वाईट वाटतंय् मला आज. केवढ्या उत्साहानं बिचाऱ्यानं चित्रं काढलीं होतीं—

**बळवंत**:—असला उत्साह काय कामाचा ? जगावेगळं वागून कसं चालेल बाबुराव ? हा हाडकपाळेपणा नाहीं आवडत आपल्याला.

**बाबुराव**:—तेंही खरं आहे. पण तरीही मला वाईट वाटलं—हातांतसुद्धां धरलीं नाहींत कुणी तीं चित्रं—अशीं फेकून दिलीं दिसल्याबरोबर ! आतां तुम्हींच सांगा विश्वासराव, तुम्हीं असतां कमिटीवर तर काय केलं असतं ?

**विश्वास**:—मी नाहीं ना कमिटीवर ? मग उगीच अंदाज कशाला ? विचारायचं तर तुझ्या बायकोला विचार.

**बाबुराव**:—तिला काय कळतं आहे त्यांत ?

**विश्वास**:—पण चित्रकार आहे ना ती ?

**बाबुराव**:—आहे म्हणजे काय—आहे झालं.—पण किती झालं तरी ती बायको माणूस आहे. विचार केल्याशिवाय उत्तर द्यायची नाहीं. काय ग, असंच ना ?

**रमणी**:—दे ना उत्तर रजनी.

**रजनी**:—किती झालं तरी मी बायको माणूस. विचार करायला अवकाश हवाय् ना मला ?

**विश्वास**:—किती अवकाश हवा ?

**रजनी**:—पांच वर्षं.

**बाबुराव**:—ऐका विश्वासराव.

**विश्वास**:—पांच वर्षं ?

**रजनी**:—मला वाटतं पांच वर्षंसुद्धां पुरायचीं नाहींत. मोठा महत्वाचा प्रश्न आहे हा. पंचवीस तीस वर्षं तरी सहज लागतील.

**बळवंत**:—रजनीबाईचा स्वभाव मोठा गमती !—भाग्यवान आहांत बाबुराव !

**बाबुराव**:—अन् तुम्हीं ?

**बळवंत**:—आमचं काय आपलं—चालला आहे जुन्या जमान्याचा संसार !

**रमणी**:—पण दादा कसा नाहीं आला अजून ?

**बळवंत**:—धक्का बसला असेल बिचाऱ्याला—साहजिक आहे. कुणाला नाहीं वाईट वाटायचं ! माणसानं सर्वस्व घालावं व्यापारांत अन् मग एकदम दिवाळं वाजावं, तसं झालंय् हें !

**विश्वास**:—पण व्यापार केला तर ना ? पाण्यांत पैसे ओतून मग रडायचं कशाला बुडाले म्हणून ?

**रजनी**:—ही पुरुषांची दृष्टि !

**बाबुराव**:—अन् बायकांची ?

**रजनी**:—बायकांचे डोळे असतात गहाण पडलेले, नाहींतर पाहिलं असतं त्यांनीं. अन् पाहिलं असतं कीं दिसलंच असतं. पण डोळेच नाहींत ताब्यांत तें पाहायचं कसं ? ( कल्याणी येते. देखणी, तरतरित आणि ठसकेबाज तरुणी—वय सुमारें तेवीस-चोवीस—भडक आणि किंमती आधुनिक कपडे करणारी—वारंवार पोषाख आणि केशरचना बदलण्याची आवड असलेली—) आलीस ? राहवलं नाहीं वाटतं ?

**कल्याणी**:—कां ?

**बळवंत**:—कळलं नाहीं वाटतं तुला ?—मोठं वाईट झालं.

**कल्याणी**:—काय वाईट झालं ?

**विश्वास**:—सुंदररावाचीं चित्रं म्हणे घेतलीं नाहींत.

**कल्याणी**:—एवढंच ना ? त्यांत काय वाईट झालं ? हें व्हायचंच होतं. असं झालं नसतं तर आश्चर्य !

**विश्वास**:—आतां ऐका. अन् हा म्हणे जिव्हाळा !

**कल्याणी**:—होय. जिव्हाळ्यानंच बोलतेंय मी. काय बिघडलं त्यांत ?

**बाबुराव**:—काय बिघडलं ? अब्रू गेली ना ? तोंड दाखवायला तरी जागा राखली आहे का ? मी असतों तर जीवच दिला असता.

**रजनी**:—हाच फरक !

**कल्याणी**:—होय—हाच फरक. मला मोठा आनंद वाटला.

**बळवंतः**—काय दुष्टपणा आहे! आनंद वाटला? सुंदररावांची फजिती झाली—बेअब्रू झाली म्हणून तुला आनंद वाटला?

**कल्याणीः**—आनंद वाटला, पण तो फजिती झाली म्हणून नव्हे—त्यांचा विजय झाला म्हणून.

**विश्वासः**—चित्रं नाकारलीं हा विजय झाला सुंदररावांचा?

**कल्याणीः**—हो.

**विश्वासः**—कसा विजय झाला?

**कल्याणीः**—मूर्खांची शिफारस म्हणजे पराजय—त्यांनीं झिड-कारलं तर तोच खरा विजय.

**बाबुरावः**—म्हणजे हे सगळे परीक्षक म्हणजे मूर्ख—अन् शहाणा काय तो तुझा सुंदरराव?

**कल्याणीः**—अगदीं अस्संच!

**विश्वासः**—ऐका—ऐका—काय मुक्ताफळं ओसंडताहेत तीं घ्या वेंचून. जग बदलत चाललंय एकूण!

**बळवंतः**—ज्याला जसं वाटतं तसं तो बोलतो. नाहीं पटलं आप-ल्याला तर सोडून द्यावं अन् आपला मार्ग आपण चोखाळावा.

**रमणीः**—तुम्हीं काहीं म्हणा—पण दादाची सर कांहीं दुसऱ्या कुणाला यायची नाहीं.

**विश्वासः**—या बळवतरावांना सुद्धां?

**रमणीः**—असं मी कुठं म्हटलं?

**विश्वासः**—म्हणजे तुझी तुलना कांहीं साऱ्या जगाशीं नव्हती. प्रश्न होता तो चित्रकारांचा, अन् हे बळवंतराव देखील सुंदररावा-सारखेच एक चित्रकार आहेत—

**बळवंतः**—सुंदररावासारखा चित्रकार नव्हे हो—मी आपला माझ्यापरीनं एक चित्रकार आहें. माझी नको कुणाशीं तुलना व्हायला!

**रजनीः**—मी म्हणतें—सुंदररावांची सर कुणालासुद्धां यायची नाहीं.

**बाबुरावः**—मग तुझी काय वाट?

**रजनीः**—सुंदररावांची सर कुणालाही यायची नाहीं.

**बाबुराव:**—मला नाहीं कबूल. गेल्यावर्षी तुला सुवर्णपदक मिळालं—

**रजनी:**—असल्या पदकांनीं कांहीं कलेची कसोटी लागत नाहीं. मला फार वाटतं—सुंदररावांचं अनुकरण करावंसं वाटतं— पण—

**कल्याणी:**—पण काय? वाटतं ना मन:पूर्वक? मग कां आपल्या मनाची आज्ञा पाळित नाहींस?

**रजनी:**—माझा नाइलाज आहे. माझी मी मालकीण नाहीं.

**कल्याणी:**—कुठं गमावलीस आपली मालकी?

**रजनी:**—लग्नाच्या बोहल्यावर.

**कल्याणी:**—काय बोलते आहेस वेड्यासारखं?

**विश्वास:**—अन् तेंही प्रत्यक्ष बाबुराव इथं समोर असतां! धन्य या स्त्रीजातीची.

**बाबूराव:**—आतां तुम्हीच पहा विश्वासराव. तुम्ही वडील माणूस आहांत म्हणून विचारतों—असलं बोलणं शोभतं का हिला? अन् तेंही इथं चार चौघांत. तरी बरं, कीं इथं सुंदरराव नाहीं. असता तर मला मेल्याहून मेल्यासारखं वाटलं असतं. ( सुंदरराव येतो. तिशीच्या आंतला एक तरुण आर्टिस्ट—पोषाख बाबुराव बळवंतरावांसारखाच—दिसण्यांत तेजस्वी—भाषणांत कणखर, सदोदित दुसऱ्यावर मात करण्याची प्रवृत्ति असलेला—डोळे पाणीदार, पाहातांच पाहणाराला फटका बसण्याचा भास होण्याइतके तेजाळ—वृत्ति संथ पण प्रसंगीं तडफदार—सर्वसाधारणपणें खिलाडू वृत्तीचा. ) आणि हा आमचा आधुनिक पत्नीधर्म!

**सुंदर:**—( हंसत ) काय झालं पत्नीधर्माचं?

**विश्वास:**—अरे हंसतो आहेस?

**सुंदर:**—तर काय रडूं? कां म्हणून?

**बाबुराव:**—कळलं नाहीं तुला? तुझीं चित्रं टांगलीं—प्रदर्शनांत नव्हे—वेशीवर टांगलीं—फेंकून दिलीं!

**सुंदर:**—मला माहित आहे—

**विश्वास:**—तरी हंसतो आहेस?

**सुंदर**:—तोच आनंद झाला आहे मला. निवडलीं असतीं तर मोठं दुःख झालं असतं मला.

**बळवंत**:—मग पाठवलींस तरी कशाला तीं ?

**सुंदर**:—फेंकून देतात कीं नाहीं तें पाहायला. वाटलं, इतक्या दिवसांनीं तरी कांहीं अक्कल आली कीं नाहीं याचा अंदाज घेत होतों; पण आतां समाधान वाटलं. नाहीं—प्रगति झाली नाहीं.—अजून आहेत तिथंच आहेत.

**बाबुराव**:—वडील माणसं आहेत तीं, याची तरी आठवण आहे का ?

**सुंदर**:—मी फार वडील आहें सर्वांपेक्षां. जन्म घ्यायला जरा उशीर केला एवढीच माझी चूक झाली.

**विश्वास**:—हा ताठा बरा नाहीं बरं सुंदर. अजून आयुष्य पुढं आहे तुझं. जगायचं आहे, संसार करायचा आहे—

**सुंदर**:—पण आधीं कलेची सेवा करायची आहे.

**बळवंत**:—आणि आम्हीं काय करतों आहोंत ?

**सुंदर**:—कलेचा बाजार—नुसता कलेचा विक्रा ! विटंबना चालवली आहे कलेची तुम्हीं.

**रजनी**:—शाबास सुंदरराव, कुणी तरी हें ऐकवलं पाहिजे होतं यांना.

**विश्वास**:—चला—निघा. कांहीं अर्थ नाहीं याच्याशीं बोलण्यांत. उगीच आलों एवढे तंगड्या तोडीत ! फारच पुढं गेला आहे हा. ( उठतो )

**बाबुराव**:—चला, चार चौघांत शोभा नको उगीच—येतां का बळवंतराव ?

**बळवंत**:—या वडील माणसांच्या बहिणाबाई यायला हव्यात ना !

**रमणी**:—मी कुठं नाहीं येत म्हटलं ? जें कळायचं तें कळलं—माझं समाधान झालं.

**बाबुराव**:—( रजनीला ) आणि आपली स्वारी ?

**रजनी**:—मी येतें थोड्या वेळानं.

**बाबुराव**:—खलबतं करायचीं आहेत वाटतं ?

**विश्वासः**—चला हो. येईल ती. अशीं काय खलबतं करणार आहे ! वाटलं तर मग येऊं आपण—चला.

( विश्वास, बळवंतराव, बाबुराव व रमणी जातात )

**सुंदरः**—( कल्याणीला ) तूं कांहींच बोलली नाहींस ?

**रजनीः**—काय बोलायचं तें ती आधींच बोलून गेली आहे.

**कल्याणीः**—माझा काय अधिकार ? मी अशी कोण आहें ? कुणासाठीं मी बोलणार ? अन् मी बोलून त्याचा उपयोग तरी काय होणार ?

**सुंदरः**—तूं पाहिलीं होतींस का तीं चित्रं ? ( रजनीला ) अन् तूं पाहिलीं होतींस ? काय वाटलं तुम्हांला ?

**रजनीः**—आमच्या मताला कोण विचारतो ?

**सुंदरः**—पण काय वाटलं तुला ?

**रजनीः**—खरं सांगूं ? मला कळलीं नाहींत तीं. वाटलं, कांहीं तरी अचाट कल्पना आहे. श्रीमंती आणि गरिबींतलं अंतर दाखवलं आहे. पाहातांच मनावर परिणाम झाला—क्षोभ उत्पन्न झाला—पण त्यांचं रहस्य कळलं नाहीं.

**सुंदरः**—तुला शिकवलंच नाहीं कुणी. स्वाभाविकपणें कळलं—पण भाषेनं सांगतां येईना. असंच ना ? ठीक. ( कल्याणीला ) अन् तुला काय वाटलं ?

**कल्याणीः**—खरंच ! मला काय वाटलं ?

**सुंदरः**—हें माझ्या प्रश्नाचं उत्तर नव्हे.

**कल्याणीः**—उत्तर द्यायची वेळ अजून आली नाहीं.

**सुंदरः**—( अस्वस्थपणें हात चोळीत बसत ) वेळ अजून आली नाहीं ! केव्हां येणार ही वेळ ? असंच चालायचं का जगाच्या अंतापर्यंत ? ज्यांना कांहीं कळत नाहीं ते सारखे बकवा करीत राहतात—अन् ज्यांना कळतं त्यांना तोंड उघडायची हिंमत होत नाहीं. मग जगाला खरं कसं कळणार ? ( उठून ) कृष्णा ! अरे ए कृष्णा !

**रजनीः**—तो कुठं आहे घरांत !

**सुंदरः**—कुणीच माझं ऐकत नाहीं. गडीमाणसं सुद्धां जुमानित नाहींत !

**कल्याणीः**—कशाला हवा आहे कृष्णा ?–गेला असेल कुठं बाहेर.
**रजनीः**—असं घर उघडं टाकून ?
**कल्याणीः**—पण हवा आहे कशाला तो ?
**सुंदरः**—माझे बूट पुसायला ! इथला केर काढायला !
**कल्याणीः**—मी पुसतें बूट—मी काढतें केर !
**सुंदरः**—तूं ? लक्षाधीशाची मुलगी तूं—कधीं केर काढला होतास आपल्या घरांतला ?—तो रेडिओ कुणी बंद केला ?—अव्यवस्था माजली आहे जिकडे तिकडे !
**रजनीः**—घरांत घरवाली नसली कीं हें असंच व्हायचं.
**सुंदरः**—अन् असली तर सौख्य लागतं वाटतं ?
**रजनीः**—खरं आहे—तेंही सांगतां येत नाहीं.—आज तुमच्या त्या विद्यार्थिनी कशा आल्या नाहींत ?
**कल्याणीः**—त्यांनाही कळलं असेल–विश्वास उडाला असेल त्यांचा.
**सुंदरः** – शक्य आहे. आतां मला कांहींच अशक्य वाटत नाहीं. ( कृष्णा येतो. मुंबईत प्रत्येक घरीं दिसणाऱ्या ' रामा ' सारखा. हुशार, चलाख पण बराचसा बेजबाबदार—संगीताची आवड असलेला—वारंवार गुणगुणायाची संवय असलेला ) कुठं होतास ?
**कृष्णाः**—इथंच व्हतों नव्ह का ?
**सुंदरः**—मग ओ कां दिली नाहींस ?
**कृष्णाः**—दूर व्हतों त्या थतं—वाइंच पट्टी खाया गेलतों.
**सुंदरः**—साफ केला नाहींस स्टुडिओ ?
**कृष्णाः**—केला न्हव का ?
**सुंदरः**—केव्हां ?
**कृष्णाः**—काल.
**सुंदरः**—अन् आज ?
**कृष्णाः**—तसा कचरा हाय कुट म्हना. जरा कुटं रंग सांडलाया–जरा कागुद पडल्याती अन् जरा हकड तकड धूळ पडलिया जनूं ! काढीन कीं उद्यां केर—तो पावतर चाललया कीं काम. मातक्यान कचराच व्हायचा, तवां म्हंगलं एवांच कशापायीं झाडायचं ?
**सुंदरः**—हें असं चाललं आहे. हेंच चाललंय् जगांत. पुनः केर

सांचणार म्हणून असलेला केर कुणी झाडून काढीत नाहीं. ( कृष्णाला ) जा चहा ठेव.

( कृष्णा ' जी ' म्हणून जातो. तोंच कुंदा आणि मंदा येतात. बारा चौदा वर्षांच्या—पोषाख आजच्या कुठल्याही शाळकरी मुलीसारखा. )

**रजनी**:—या आल्या शिष्यिणी. काय ग कुंदे, मंदे, उशीरसा केलास यायला ?

**कुंदा**:—कधीं आलें होतें मी वेळीं ? अन् आलेंच वेळीं तर मास्तर कुठं असतात इथं ?

**मंदा**:—नाहीं हं—मी येतें अगदीं वेळीं. पण आज गायला जायचं होतं मला.

**कल्याणी**:—अस्सं ! कुंचल्याबरोबर तंबोराही घेतला आहेस का हातीं ?

**सुंदर**:—तुला गातां येतं मंदा ?—मला माहित नव्हतं अजून.

**कुंदा**:—हें खरं का मास्तर ?

**सुंदर**:—काय ?

**कुंदा**:—तुमचीं चित्रं म्हणे यंदासुद्धां नापसंत केलीं ?

**सुंदर**:—होय.

**कुंदा**:—मग आतां ? बाबा म्हणाले, असल्या मास्तरांच्या क्लासांत जाऊं नकोस—

**सुंदर**:—शाबास तुझ्या बाबांची ! उद्यांपासून तूं बंद ?—मग आजच जा कशी.

**कुंदा**:—असे काय रागावतां मास्तर. पुढं तरी ऐका—

**मंदा**:—फार संतापले होते हिचे बाबा—पण मी समजूत घातली त्यांची—

**रजनी**:—हिच्या बाबांची समजूत तूं घातलीस ? शाबास ! कशी समजूत घातलीस ?—

**सुंदर**:—बस्स पुरे—मला कांहींसुद्धां ऐकायचं नाहीं. जा—दोघीही निघून जा—अन् बाकीच्यांनाही सांगा—डांगोरा पिटा साऱ्या गांवभर—जा.

**मंदा**:—असं काय बरं मास्तर ! आधीं ऐका तर खरं—

**सुंदर**:—हं बोल—ऐकतों—काय वाटेल तें बोललांत तरी ऐकतों. जगाचीं बोलणीं ऐकून घेण्याकरतांच ना मी जन्म घेतला आहे ? हं बोल—बोल—थांबलीस कां—कर बोलणं सुरू !—

**कल्याणी**:—एवढ्याशा मुलींना काय बोलतां हें ? त्यांना काय कळतंय् ? ऐकतात लोकांच तेवढंच ना सांगतात ? मन शांत ठेवण्याची वेळ कुठली असेल तर हीच आहे !

**सुंदर**:—Thank You ! ( थ्यँक यू )—हं—काय म्हणत होतीस ?

**मंदा**:—काय बरं म्हणत होतें मी ? कशी विसरलें !

**कल्याणी**:—आतां राहूं दे. तुला गातां येतं ना ?—मग एक गोडसं गाणं म्हण पाहूं.

**रजनी**:—वाः छान उपाय काढलास. त्रासलेल्या जिवाला गाण्यासारखं दुसरं औषध नाहीं.

**कल्याणी**:—पण हें पहा मंदे, कसलं तरी रडवं गाणं म्हणूं नकोस. फार बोकाळलीं आहेत हल्लीं रडवीं विरहगीतं—तसलीं नकोत बरं. कांहीं तरी उत्साह वाटेल, वीरश्री चढेल, असं कांहीं तरी म्हण.

**सुंदर**:—गाण्यानं का शांत होणार आहे माझा जीव ? कसा भडका उडाला आहे आंतून !—तरीही वरून हंसतों आहें—दांभिकपणा करतों आहें—केशवसुतांनीं म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं—हे दिन चिंतांचे । परंतु लटिके हंसण्याचे—

**कल्याणी**:—हे दिन जाऊं दे । मला तुज गाणें गाऊं दे—हं म्हण मंदा—

**मंदा**:—काय म्हणूं कुंदे ?

**कुंदा**:—मी काय सांगूं ? मला कुठं तुझीं गाणीं माहित आहेत ?

( मंदा सूर धरते—पहिल्यानें हळुहळु गुणगुणते—मग मोकळ्या आवाजानें गाऊं लागते. गाणें सुरू असतां सर्व स्तब्धपणें ऐकत आहेत—सुंदरराव पहिल्यानें अस्वस्थ असतो पण नंतर शांत होऊं लागतो )

**गीत**—( कवि राजा बढेकृत )

**हास जिवारे हास जिवा ।**

**जीवनिं ये मधुमास ॥**

**मलयानिल करि मुकुलित कलिका ।**

**लंपट फेर धरी चंचरिका।**
**गगनिं हसत ही मधुर चंद्रिका।**
**बांध गडे जीवास॥**

( कवि, ऑथर आणि नट प्रवेश करतात )

**कवि:**—हं थांब—कुणाचं हें काव्य !

**ऑथर:**—कुणाचंही असलं तरी तुझं नव्हे खास ! तूं कशाला बेट्या जिवाचा आटापेटा करतोस ?—बरं, सुंदरराव, ही काय गडबड आहे ?

**कल्याणी:**—कसली गडबड ?

**ऑथर:**—कसली गडबड म्हणे—सारी मुंबई गाजून गेली आहे—वर्तमानपत्रं किंचाळताहेत—

**कवि:**—कीं सुंदररावाला यापुढं प्रदर्शनांत बहिष्कार घालणार म्हणून. अन् विचारते कसली गडबड ?

**ऑथर:**—श्रीमंताचीच पोर कीं नाहीं !

**रजनी:**—अरे जरा बोलूं तर द्याल. हे नटवर्य पहा—कांहीं बोलताहेत का ?—

**नट:**—शब्द—समजलं ?—शब्दाला मोल आहे. अक्षर कवडी-मोल आहे. वाङ्मय म्हणे !—बोलणारा नसता तर लिहिणाराला कोण विचारणार होता ? आधीं काय ?—बोला ?—आधीं शब्द कीं आधीं अक्षर ?

**ऑथर:**—पुरे झाला तुझा शब्द ! आधीं मला हें सांगा, ही बातमी खरी का ?

**सुंदर:**—अन् खरी असली तर ?

**ऑथर:**—तर मी त्या विषयावर एक कादंबरी लिहिणार आहे.

**नट:**—नाटक कां नाहीं लिहित ?

**ऑथर:**—कोण करणार तें नाटक ? या आर्टिस्ट लोकांची लोकांना माहिती आहे कुठं ? नाटकाला विषय पाहिजे तो ओळखीचा, लोकांच्या परिचयाचा, तर ना कांहीं कळणार प्रेक्षकांना ?—आर्टिस्टचा विषय नाटकाला योग्य नाहीं.

**कवि:**—काव्याला योग्य आहे तो विषय.

**ऑथरः**—खरं आहे—काव्यं कुणी वाचित नाहीं—

**कल्याणीः**—काय स्वार्थी आहेत एकेक!—आपआपल्या पोळीवर तूप ओढायला पाहातोय् प्रत्येक जण. काय विचारलं, याचीसुद्धां आठवण नाहीं !

**सुंदरः**—असंच आहे. दुसऱ्याचं दुःख ही स्वतःची करमणूक असते. म्हणूनच दुःखाचं कौतुक होतंय् जगांत. नाहीं तर कुणीच कुणाला विचारलं नसतं ! ठीक आहे बेट्यांनो, चालूं द्या. काय पाहिजेय् तुम्हांला ?—माझी फटफजिती झाली—हेंच ना ? खरंय् तें !—

**कविः**—मोठं आश्चर्य आहे. रजनी, तुला काय वाटतं ?

**रजनीः**—तसंच वाटतं मला !

**कविः**—कीं सुंदरची फटफजिती झाली म्हणून !—ऐका ऑथर, ही तुमची स्त्रीदेवता बरं !

**ऑथरः**—अन् तुझी ?

**नटः**—दोघेही सारखेच—दोघेही सारखेच !—पीळ नाहीं आंत-डयाला—आंतून पेटत नाहीं—जळत नाहीं—धगधगत नाहीं. काय वाटतं तुम्हांला?—अं ?—काय वाटतं ? त्या मुली पहा—या सुंदरच्या शिष्या—काय वाटेल त्यांना ? अं ! बोला, काय वाटेल त्यांना ?

**कुंदाः**—कांहीं नाहीं वाटत आम्हांला. अगदीं कांहीं सुद्धां वाटत नाहीं.

**ऑथरः**—घे—झाली फजिती !—बाबारे, हें तुझं काम नव्हे. निरीक्षण पाहिजे—अवलोकन पाहिजे—सूक्ष्मदृष्टी, भावनात्मकता पाहिजे; ज्ञानेश्वराच्या रेड्यासारखं ओरडलं म्हणजे कांहीं जगाचं रहस्य कळत नाहीं.

**कल्याणीः**—जो तो आपलं तुणतुणं वाजवतो आहे !

**सुंदरः**—असं म्हणूं नकोस कला ! स्वतःकडे पाहिल्याशिवाय दुसरा कळत नाहीं. आधीं स्वतःला पारखलं पाहिजे. काय चुकलं त्यांचं ? आपआपल्या परीनं प्रत्येक जण पाहतोय्. जगाच्या दृष्टीनं माझी नाचक्की झाली. हा प्रसंग त्यांच्यावर असता तर त्यांना

दुःख झालं असतं. तसंच त्यांना वाटलं—अन् म्हणूनच ते माझी खबर घ्यायला आले. मला तसं वाटलं नाहीं—

**कवि**:—काय म्हणतोस ? नाचक्की झाली असं तुला वाटलं नाहीं ?

**सुंदर**:—नाहीं. माझा जय झाला असं वाटलं मला.

**ऑथर**:—ऐक कवड्या—याला म्हणतात मर्द ! नाहीं तर तूं—कुस्करलेल्या वेणीतलीं फुलं वेंचणारा तूं—

**सुंदर**:—असं म्हणूं नको. त्याच्यापरीनं त्याचंच खरं आहे. तूं मला मर्द म्हणतोस—होय ना ?—मग कां आलास मला विचारायला ?—तुझंही बरोबर आहे—तुला सहानुभूति वाटली. नाहीं ? सारी मुंबई गाजून गेली, वर्तमानपत्रं किंचाळूं लागलीं म्हणून तूं मला विचारायला आलास ? होय ना ? कां ?—पहा कल्याणी, हें असं आहे. माणूस दुसऱ्याला नावं ठेवतो त्यावेळीं स्वतः काय करतों हें पाहात नाहीं.

**ऑथर**:—वाः—म्हणजे आमची सहानुभूती फुकटच गेली वाटतं ?

**सुंदर**:—मी मर्द आहें असं तुला वाटतं ना ?—मग सहानुभूती कसली ?—प्रसंग असेल तेव्हां ना सहानुभूति दाखवायची ? मग मला जर हा 'प्रसंग' वाटत नाहीं, तूं मला मर्द म्हणतोस तेव्हां तुलाही वाटत नाहीं—मग आलास कां विचारायला ?

**रजनी**:—हं—आतां द्या ना उत्तर !

**कवि**:—कुंदे—मंदे—तुम्हीं तें तेवढं माझं भावगीत म्हणा पाहूं. कशाला हवीय् ही पोकळ चर्चा ? काव्यानंदासारखा दुसरा आनंद नाहीं. सारं दुःख विसरून जातं या आनंदांत !

**नट**:—पुनः दुःख म्हटलंस ! अं: ! पुनः दुःख म्हटलंस ? बुद्धिमंद तरुणा, पुनः दुःख म्हटलंस ? हजार वेळ तो सांगतो आहे, कीं मला दुःख झालं नाहीं. हा प्रसंग नाहीं—हा विजय आहे,—तरीही म्हणतोस कीं दुःख झालं म्हणून ! धिक्कार—धिक्कार—धिक्कार असो तुला !

**कल्याणी**:—सारा बनावटांचा बाजार !

**ऑथर**:—कोण बनावट ? आम्हीं ? ऐक कवि—ऐक नटवर्य—आम्हीं बनावट—अन् कुंचल्याच्या केरसुणीनं जाड्या कागद-

कॅनव्हॉसचं आंगण सारवणारे हे जातिवंतपणाचे पुतळे ! चला, एक क्षणभरसुद्धां राहायचं नाहीं इथं.—जिथं माणसाला माणुसकीच नाहीं, तिथं बोलायचं काय अन् सांगायचं काय ? चला.

**कवि**:—खरं आहे—खरं आहे. रंगाच्या पातेल्यांत डुंबत बसणाऱ्या या बेडकांना शब्दाची काय किंमत ! चला.

**नट**:—शब्द—बस्स शब्द—' आम्हीं शब्दसृष्टीचे ईश्वर. '

**ऑथर**:—तुम्हीं नव्हे—आम्हीं.—आम्हीं लेखक—ज्ञानेश्वराचे वंशज—

**कवि**:—तुम्हींही नव्हे—शब्द सृष्टीचे ईश्वर ते आम्हीं. ज्ञानेश्वर काय म्हणतात ?—आतां वंदू कवीश्वर, जे शब्दसृष्टीचे ईश्वर—

**ऑथर**:—बस्स झालं. चला—( तिघे जातात. )

**सुंदर**:—पाहिलंस कला ?—पाहिलंस रजनी ?—हें असं चाललंय् जगांत.—अन् ही नवी पिढी मुकाट्यानं पाहातेय्. काय वाटेल यांना ? आम्हीं सारे असे आपसांत झगडतों आहोंत—मुलंबाळं पाहाताहेत आणि आम्हीं मानाची अपेक्षा करतों. कुठंच खरं अंतःकरण नाहीं.—कुणीच प्रामाणिक नाहीं.—असं वाटतं—! जाऊं दे. नको तो विषय. हं कुंदे—मंदे—होऊं द्या तुमचं गाणं सुरू.

**कल्याणी**:—कसं ऐकवतं गाणं ? माझं मलाच आश्चर्य वाटतं. मन कसं खळबळून उठलंय्—संताप येतोय् जगाचा, पण वाटतं—

**रजनी**:—काय वाटतं ?

**कल्याणी**:—कांहीं नाहीं वाटत !—म्हण पाहूं मंदे !—छानसं हं ! गोडसं—अगदीं ताज्या फुलासारखं एकादं गोड गाणं म्हण.

**कुंदा**:—आतां नाहीं म्हणवत माझ्यानं ! कोण कोण येतात, काय काय बोलतात, जीव कसा करपून जातो.

**मंदा**:—आधीं हिचे बाबा रागावले होते घरीं—कशी बशी मी समजूत घातली त्यांची—

**कुंदा**:—यायलासुद्धां देत नव्हते मला—असं काय झालंय हो मास्तर ?

**सुंदर**:—( हंसत ) मला दिखिल कळलं नाहीं अजून !

**कुंदा**:—चित्रं नापसंत केलीं म्हणजे काय ? अन् कोण हे नापसंत करणारे ? मला तरी फार आवडतात तुमचीं चित्रं !

**रजनीः**—( मंदेला ) अन् तुला ग !

**मंदाः**—मला ? हंः !—ऐकायला हवी होतीस तूं ! कशी फाड्-फाड् बोलत होतें हिच्या बाबांजवळ—

**कल्याणीः**—तोंड तरी पहा बोलणारीचं ! माशी उडत नाहीं तोंडावरची अन् म्हणे फाड्फाड् बोललें—

**कुंदाः**—नाहीं अं—खरंच बोलली ती—अगदीं गप्प केलं बाबांना हिनं. म्हणून तर ही आलें.—तरी दिखील शंका आहेच, कुणी काय बाबांना सांगितलंय कोण जाणे—पण अगदींच संतापले आहेत बाबा.

**सुंदरः**—पाहिलंत ? हें असं आहे. इतक्या लवकर हें वादळ इतकं घरोघर पसरेल असं नव्हतं मला वाटलं !

**रजनीः**—उपद्व्यापी माणसं आहेत ना ?—एकेक जण घरोघर फिरत होते प्रचारकार्य करीत !—

**कल्याणीः**—परंपरेचे गुलाम सारे ! जरा कोण कुठं मळलेली वाट सोडून बाजूला वळला, जरा नवी वाट निर्माण करूं लागला, कीं प्राणच जातो मेल्यांचा !

**कुंदाः**—एकदां बाबांची समजूत घालतां का मास्तर ?

**सुंदरः**—माफ करा मुलींनों, तेवढंच होणं नाहीं. कुणाकडेसुद्धां याचना करणार नाहीं मी—मग उपाशीं मरावं लागलं तरी बेहेत्तर !

**मंदाः**—तें खरं. पण मग आमचं काय ? आम्हांला कोण शिकवणार मग ?

**सुंदरः**—वाः किती तरी आहेत दुसरे ! शिवाय आर्ट स्कूल आहे !

**मंदाः**—ड्रॉइंग मास्तर व्हायचं नाहीं मला—

**कल्याणीः**—मग कोण होणार आहेस ?

**मंदाः**—मी मास्तरांसारखीच मोठी चित्रकार होणार आहें !

**रजनीः**—म्हणजे ज्यांचीं चित्रं फेंकून देतात तसली चित्रकार होय !

**कुंदाः**—देऊंदेत फेकून ! आम्हीं स्वतःच बसूं आमचीं चित्रं बघत !

**सुंदरः**—( अर्धस्वगत ) पुढं टिकेल का ही वृत्ती !—हें बालपण—हें स्वाभाविक जीवन—स्वाभाविक विचार—स्वाभाविक दृष्टी—पार नाहींशीं होतात व्यवहाराचे फटके बसले म्हणजे !—

**कुंदा**:—व्यवहार म्हणजे काय हो मास्तर !

**सुंदर**:—एव्हां नको त्या गोष्टीचा विचार करूं. पुढं कळेल आपोआप—

**कुंदा**:—हें बरं नव्हे मास्तर—सांगा ना.

**सुंदर**:—हें आतां मी सांगत नाहीं ना तुला, यालाच म्हणतात व्यवहार !

**रजनी**:—असं कशाला सांगतां त्यांना ?—मी सांगतें ऐक—

**सुंदर**:—नको रजनी, निर्मळ मनांत विषाचं बीज कशाला पेरतेस ? अज्ञानांत आनंद असतो म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. कुंदे, मंदे, आपण तो आनंद एकदां चाखूंया. तुम्हीं पोरींनीं हट्ट धरला तरी तुमचीं वडील माणसं कांहीं तुमचं ऐकणार नाहींत. तेव्हां आज हा शेवटचाच दिवस. पुढं उजाड होणार ही जागा !— भुतासारखं कुंचले फिरवीत मला एकटंच बसावं लागणार इथं. तेव्हां जायच्या पूर्वी कांहीं गोडशा आठवणी ठेवून जा इथं. एक छानसं भावगीत म्हणा पाहूं—अगदीं गोड—गोड गोड रडूं येईल असं. ( दोघीही नुसत्या पहात राहतात ) नाहीं ऐकत ? खरंच तें— आतां कोण ऐकतो माझं. जगानं नादान ठरवलेला माणूस मी—

**कुंदा**:—नाहीं मास्तर—माफ करा—असं कांहीं बोलूं नका—

**मंदा**:—काय म्हणूं कल्याणी ?—

**कल्याणी**:—प्रेम केलें काय हा झाला गुन्हा—म्हण !

**सुंदर**:—खरं आहे तें ! हाच प्रश्न उभा राहिला आहे माझ्यासमोर.

**रजनी**:—कुणावर प्रेम केलं ?

**सुंदर**:—माझ्या कलेवर.

**रजनी**:—कलेवर ? या कलेवर ?—कल्याणीवर ?

**सुंदर**:—कलेवर—माझ्या चित्रकलेवर—

( त्या एकदम गाऊं लागतात—तो स्तब्ध होतो )

**गीत**—( कवि राजा बढेकृत )

**प्रेम केलें काय हा झाला गुन्हा**
**अंतरींची भावना सांगूं कुणा ?**
**भोगिली शिक्षा पुरी मी प्रीतिची**

साहवेना ती सुखाची वेदना
साक्ष द्याया बोलके झाले मुके
जीभ चावूनी टळे कां वंचना?
रंगवीते चित्रलेखा प्रेमला
स्वप्नांतल्या कीं त्या उषेच्या मीलना
बोलुनी केलीस ही जाहीर चोरी
हांसशी कां? रे गुन्हेगारा पुन्हा

**बाबुराव:**—( प्रवेश करून ) झालीं का तुझीं खलबतें ? ( कुणीच त्याचें भाषण ऐकत नाहीं—गाणें सुरू आहे ) आतां काय म्हणावं यांना? जलसे करताहेत गाण्याचे!—अरे आम्हीं काय गात नाहीं! मी चित्रकार नसलों तरी गाणारा आहें म्हणावं—अरे, कान फुटले का तुमचे ?—( अगदीं साहाजिकपणें तो त्यांच्याबरोबर गाऊं लागतो ).

**सुंदर:**—कोण बाबुराव! वा: ! छान जोड जमली. नवी अन् जुनी पिढी अशी एका सुरांत गाऊं लागली तर या पृथ्वीचा स्वर्ग होईल!

**बाबुराव:**—( रागावून दांत ओठ चावीत गात ) काय झाला हा गुन्हा ? लग्न केलं ना आम्हीं ! तिथं चूक झाली—तिथं घसरलों ! अन् चित्रकला घरांत आणली.

**कुंदा:**—पण गायनकला होती ना आधींच घरीं ?

**बाबुराव:**—गायनाला कोण विचारतो ? तिचं कांहीं प्रदर्शन मांडीत नाहींत कुणी ! शिवाय मी तरी कुठं असा मोठा गवई आहें ? आपला जरा गुणगुणतों आंघोळ करतांना ! "काय झाला हा गुन्हा !"

**कुंदा:**—( वेडावीत ) 'कोण गातें हें पुन्हां ?'

**बाबुराव:**—चल घरीं आतां. चूल पेटली पाहिजे ना घरांत ? चित्रं चाटून पोट भरत नाहीं म्हणावं !

**कुंदा:**—अन् यांचीं चित्रं विकलीं तीं ! बाराशें रुपये आलेयत ना ?

**बाबुराव:**—गप्प बैस !—

**मंदाः**—अन् सहाशांचं बक्षिस मिळालं तें मागं !—अन् सुवर्णपदक !—

**कुंदाः**—अन् तुम्हांला कसली नोकरी आहे हो बाबुराव ?

**बाबुरावः**—तुझ्या थोबाडींत द्यायची !—फार जीभ लांब झालीय् ! फार चढवून ठेवल्या आहेत या पोरी ! वडील नाहीं, धारं नाहीं, लागल्या बोलायला. चला आतां घरीं !

**मंदाः**—अन् तुम्हांला—

**रजनीः**—गप्प रहा ग—चलायचं म्हटलं.—येतेस का कला ?

**कल्याणीः**—नाहीं. तूं जा.

**बाबुरावः**—अन् तूं एकटी राहाणार इथं याच्याबरोबर ? अरे कांहीं लाजशरम !

**सुंदरः**—जा कला, कलेची न् माझी तुटलीक झाली आतां. कोण नको मला. सारे जा निघून !—त्रास आला या माणसाच्या जातीचा.—माणुसकी शोधायला आतां मला कुत्रींमांजरं जवळ केलीं पाहिजेत !

**बाबुरावः**—काय खचतोस सुंदर ? हें आपलं वेड सोड नि इतर चार चित्रकारांसारखं काहीं तरी काढ ! कोण कुठला तो रशियन कीं जर्मन, हिमालयांत जाऊन बसलाय्, त्याचं अनुकरण तुला कशाला ?—

**सुंदरः**—कुणाचं अनुकरण करीत नाहीं मी ! माझा मी स्वतंत्र आहें.

**बाबुरावः**—पण आम्हांला तसं वाटतं, जगाला वाटतं तूं त्या रोअरिकूची श्री गिरवतोस म्हणून !—

**सुंदरः**—निघा इथनं—निघा. सारीं चालतीं व्हा इथनं. विषाचे फुत्कार नकोत माझ्या या निर्मळ जागेंत. निघ रजनी—जा आपल्या धन्यामागनं. निघ. अन् तुम्हींही जा ग—उद्यांपासून इथं येऊं नका. ( कलेशिवाय सर्वांना लोटून बाहेर घालवतो ) तूं कशाला राहिलीस ? तूंही जा. निघ इथनं !—कुणाचा सुद्धां सहवास नको मला. एकटाच !—निघ—

**कलाः**—पण मी म्हणतें—

**सुंदरः**—कांहीं म्हणूं नकोस. माफ कर. इथून निघून जा.

**कल्याणीः**—कशी जाऊं ? जें बोलायचंय तें बोलल्याशिवाय कशी जाऊं ?

**सुंदरः**—कांहीं ऐकायचं नाहीं मला.

**कल्याणीः**—मी आपल्याशींच बोलेन तर मग. नका ऐकूं ऐकायचं नसलं तर. वेडे कले—

**गीत** ( कवि राजा बढेकृत )

**कुणि पाहिलि का ग आस कधीं ती मिटली ।**
**भाळलीं अंतरें प्रीतीवांचुनि तुटलीं ॥**
**ही जिवा जिवांची अबोल वेडी प्रीती ।**
**नाहींच भान मग कुठली तिजला भीती ॥**
**तें वेगळेंच ग जग ।**
**जवळींच सदा जिवलग ।**
**डोळ्यांतील निळसर ढग ।**
**त्या आड लाजरी भाव-चंद्रिका लपली ।**
**म्हणतील म्हणो तिज, ' चंद्रावरती रुसली ' ॥**
**कशि तुटेल बाई मिठी ।**
**हो जीव कुडीची तुटी ।**
**लाखांत झांकल्या मुठी ।**
**अन् भेटींगांठित मूठ अचानक सुटली ।**
**देहावर सारी वसंतशोभा वठली ॥**
**माधवीलता ललिता रसाला कवळी ।**
**ती प्रीत जयाची जुळलि एकदां जुळली ॥**

[ कल्याणी हळूहळू जाते. सुंदरराव पाहात राहातो. दारापर्यंत जाऊन डोकावून पाहून परत येतो नि खुर्चीवर बसतो ]

**सुंदरः**—एकटाच—मी एकटाच—या उभ्या भारतवर्षात मी एकटाच !—

( पडदा )

# अंक दुसरा

[ स्थळः—पहिल्या अंकाप्रमाणें. एक नग्नचित्र अर्धवट पुरें केलेलें घोड्या ( *Easel* ) वर आहे. पडदा वर जातो तेव्हां जागा आणि सामान झाडण्याचा फार्स करीत कृष्णा स्वतःशीं गुणगुणत गात आहे. ]

**कृष्णाः**—( गात स्वतःशीं ) यमुना जलिं खेलूं खेल कन्हैय्या कां—

**ऑथरः**—( प्रवेश करून ) अरे ए—तुझे मालक कुठं आहेत !

**कृष्णाः**—यमुना जलिं खेलूं—

**ऑथरः**—काय खेळूं ?

**कृष्णाः**—खेल कन्हैय्या कां—

**ऑथरः**—गप्प बैस—

**कृष्णाः**—कोन र तूं ? लइसा वरडतुयास !

**ऑथरः**—मालक कुठं आहेत तुझे ?

**कृष्णाः**—कुटल मालक ?

**ऑथरः**—तुझे मालक !

**कृष्णाः**—माझा न्हाइ कुनि मालक. मीच हाइ इयला मालक.

**ऑथरः**—अन् सुंदरराव कोण तर मग ?

**कृष्णाः**—ते व्हय् ? ते हायती एक पावन ! कंदिमंदि येत्याती हत—न्हात्याती बी कंदीमंदी !—ज्येवत्याती बी हत कवांकवां !—म्याच घालतों कि त्येंना खाया !—

**ऑथरः**—अस्सं !—एकूण तूं इथला मालक अन् ते इथले पाव्हणे ! छान !—

**कृष्णाः**—छान काय ? खरच हाय त्यें ! त्येंनाच इचारा—त्यासूनी काय ठाव हाय, कीं हत काय हाय न काय नाय—की हत कोन येत्याती न् कोन् जात्याती—कीं आडका कि पैका—काय हाय् का त्येंच्यापाशीं ? मीच देतों ना तो !—मंग मालक कोन ?

**ऑथरः**—खरं आहे तें. गृहं तु गृहिणीहीनं कांतारः !—

**कृष्णाः**—काय म्हंगालांत् ?

**ऑथरः**—कांहीं नाहीं—मी म्हणत होतों, कीं घरांत घरधनीण

नसली, कीं नोकरच घरचा मालक होऊन बसतो.—गोष्टीला चांगली थीम आहे ही ! उद्यां लिहितोंच एक गोष्ट या विषयावर !—बरं, सुंदरराव कुठं आहेत ?

**कृष्णाः**—मला काय ठावं !

**ऑथरः**—आतां काय करावं याला ?—

**कृष्णाः**—सोधावं !—

**ऑथरः**—कुठं ?

**कृष्णाः**—पिरथिमीच्या पाठीवर. जा कीं धुंडाया !—आतां काय म्हंगावं तुला बामना, आमच शेट काय अस हव थतं सांपडत्याल ! कुट गोरी गोमटी आवा दिसली की थतच पघा—कुट तरी थतच असत्याल—

**ऑथरः**—खरं आहे तें. आमचं हेंच चुकलं. लेखकाला कोण विचारतो ? हाच चित्रकार असतों—हंः—आधींच चुकलं, आतां कसला पश्चात्ताप !—वाः !—( एका नग्न चित्राकडे पाहात )—वाः हें असं सुद्धां पाहायला मिळतं या चित्रकारांना !—नशिबवान आहेत ! ( चित्राकडे पाहात राहातो तोंच बाबुराव येतो )

**बाबुरावः**—काय पाहतोयस रे !

**ऑथरः**—( सुस्कारा टाकून ) चित्र आहे तें—मॉडेल नव्हे ! हाय रे ही लेखणी !

**बाबुरावः**—सुंदरराव कुठं आहे ?

**कृष्णाः**—जो उठतो तो इच्यारतो, सुंदरराव कुट हायती ! अर, कुनी एकदां या किष्णाला इचारा की !—चा घेतों मी अन् इचारपूस करत्यात—

**ऑथरः**—सुंदररावांची ? खरं आहे तें ! पुस्तकं लिहितों आम्हीं पण पुस्तक खपलं म्हणतात वरच्या चित्रामुळं !—

**बाबुरावः**—मग घालतां कां वर चित्रं ?

**ऑथरः**—प्रकाशक ऐकत नाहींत ! अन् तेंही खरं आहे—वरचं चित्र गोंडस नसलं तर आंत पाहातो कोण उघडून ? उगीच नाहीं फडक्यांच्या कादंबऱ्या खपत त्या !

**बाबुरावः**—( कृष्णाला ) अरे ए, आमची ही आली होती का इथं ?

**कृष्णाः**—कोन तुमची ही !—किती आवा येत्याती हतं. त्यांतली तुमची कोन न माजी कोन, कुनी वळखावं ! दादल्याची पाटी लावाया व्होवी परतेक आवाच्या डोकश्यावर !

**बाबुरावः**—आतां काय म्हणावं ! अगदीं थेट धनी तसा नोकर. सरळ उत्तर देईल तर हराम !

**ऑथरः**—हें पहा बाबुराव, मला एक बातमी कळली आहे.

**बाबुरावः**—कसली ? सुंदररावाची ? आतां आणखी कसली भानगड केली आहे त्यानं ?

**ऑथरः**—भानगड नव्हे—त्यानं तीं आपलीं चित्रं म्हणे पारिसला पाठवलीं.

**बाबुरावः**—कुठलीं चित्रं ? तीं फेंकून दिलेलीं ?—काय मूर्ख आहे ! पारीसचे चित्रकार काय आंधळे आहेत कीं गाढव आहेत ? —कुणी सांगितलं तुला ?

**ऑथरः**—कुणी का असेना पण तें खरं आहे. ज्यानं सांगितलं, त्यानंच पार्सल केलं होतं त्या चित्रांचं ?

**बाबुरावः**—कुणी पण ?—सांग तर खरं—मी नाहीं सांगणार कुणाला.

**ऑथरः**—बळवंतरावानं सांगितलं—त्याला बायकोनं सांगितलं त्याच्या. ( रमणी येते. ) अरे बापरे ! तीच आली.

**रमणीः**—घाबरलांतसे ?

**ऑथरः**—कोण घाबरलं ?—मी ?—कुणाला घाबरणार ? कां म्हणून ?

**रमणीः**—दादा आज यायचा नाहीं इथं. कुणी आलं भेटायला तर त्यांना उद्यां यायला सांगितलंय त्यानं.

**बाबुरावः**—तूं निरोप आणलायूस वाटतं हा ?

**रमणीः**—हो. मला मुद्दामच पाठवलं त्यानं.

**ऑथरः**—बळवंतराव कुठं आहेत ?

**रमणीः**—असतील कुठं तरी !

**ऑथरः**—आतां हें पहा, भावाचा निरोप घेऊन येते पण नवऱ्याचा पत्ता माहित नाहीं—असं चाललंय् जगांत.

**बाबुराव**:—अस्सं चाललंय् जगांत! अगदीं डोळे उघडून आर्टिस्टबरोबर लग्न केलं, तिथंच चुकलं. कुठं असते, कुठं भटकते, कुणाबरोबर जाते—

**ऑथर**:—अन् काय करते—

**रमणी**:—गप्प बसा!

**बाबुराव**:—कांहींच सांगतां येत नाहीं. आतां शोधूं कुठं हिला. फार वेड लागलंय् तिला सुंदररावाचं. सारे लोक त्याला नावं ठेवतात, तर ही त्याची स्तुतिस्तोत्रं गाते! एवढं नांव ठेवलेलं खपत नाहीं!—एकूण काय, आपलीच चूक झाली म्हणायची.

**रमणी**:—तिला शोधतां अहांत होय? हात्तिच्या! मग तसं कां नाहीं विचारलंत मला?—

**बाबुराव**:—तुला भेटली ती?

**रमणी**:—चला माझ्याबरोबर.

**बाबुराव**:—कुठं?

**ऑथर**:—अहो कुठं काय म्हणतां? जा की तिच्याबरोबर. नगास नग तर आहे!

**रमणी**:—गप्प बैस. चला. ( दोघें जातात ).

**ऑथर**:—आम्हांला नुसतं ' गप्प बैस. ' ऑथर ना आम्हीं! हे गवई आहेत! गाणं म्हणजे कला, नाचणं म्हणजे कला, चित्रं काढणं म्हणजे कला—कला नव्हे काय तें एक लेखन! कवि तरी झालों असतों!—कायरे कृष्णा, ऐकलंस ना?

**कृष्णा**:—ऐकतुया नव्ह का!

**ऑथर**:—मग काय वाटतं तुला?

**कृष्णा**:—बर वाटतं!

**ऑथर**—काय बरं वाटतं? आम्हांला कुणी विचारीत नाहीं हें बरं वाटतं?

**कृष्णा**:—तसं न्हव. म्या म्हंगलं, कुनी आवा अशी कुनालाबी संगाट न्हेया लागली, की वायंच बर वाटतं—

**ऑथर**:—अरे, वाईट वाटलं पाह्यजे त्यामुळं!

**कृष्णा**:—त्ये बी खर हाय्!

**ऑथरः**—मग आतां काय ? इथं तर कुणीच नाहीं. काय बसून करणार इथं ? हीं असलीं चित्रं पाहिलीं, कीं जीव कसा कासावीस होतो. राहावतही नाहीं कीं जाववतही नाहीं !—कायरे, हीं असलीं चित्रं काढतात, तेव्हां तूं असतोस का इथं ?

**कृष्णाः**—न्हायरे बा, कड्याकुलपं लावूनशान घेत्याती की !

**ऑथरः**—अस्सं ? फार वाईट !

**कृष्णाः**—त्ये बी खर हाय.

**ऑथरः**—एकूण काय, हरीभाऊ म्हणाले तें कांहीं खोटं नव्हे—जग हें असं आहे !

**सुंदरः**—( रजनीसह प्रवेश करून ) काय केलं रे जगानं ऑथर ?

**ऑथरः**—जग काय करणार ?—काय करतों तें आम्हीं करतों—नि मग जग आमच्या तोंडावर थुंकतं.

**सुंदरः**—त्याची कोण पर्वा करतो ?

**ऑथरः**—तेंच तर मी म्हणतों ना !—बरं, होतास कुठं अजून ?

**सुंदरः**—काय काम आहे ?

**ऑथरः**—तसं काम नाहीं कांहीं—सहज आपल्या गप्पा.—

**सुंदरः**—गप्पा मारायला मी मोकळा नाहीं.—कृष्णा, जा चहा ठेव. ( कृष्णा जातो )

**ऑथरः**—काय म्हटलंस ?

**सुंदरः**—मीं म्हटलं—गप्पा मारायला मी मोकळा नाहीं.

**ऑथरः**—तें दिसतंच आहे—असलंच चित्र निघायचंयू वाटतं ?

**सुंदरः**—जा पाहूं इथनं.

**ऑथरः**—चित्रं पारीसला पाठवलींस म्हणे ?

**सुंदरः**—तुला काय करायचंयू त्याच्याशीं ? तूं कांहीं चित्रकार नाहींस. आतां जा पाहूं !—

**ऑथरः**—बरं बुवा.—रजनी, तुझा नवरा आला होता तुला शोधीत.

**रजनीः**—बरं—

**ऑथरः**—बरं काय—त्याचा जीव झालायू कासावीस तुझ्यासाठीं नि तूं ही अशी उनाडतेयूस.

**सुंदर**:—आतां तूं जा म्हणतों ना!—

**ऑथर**:—अस्सं!! बरं, मी जातों—पण बाबुराव भेटेल मला. ती रमणी घेऊन गेलीयू त्याला—बरोबर गेलींयूत दोघं! काय गंमत आहे—( जात असतां परतून ) पण चहा आणतोयू ना कृष्णा?—

**सुंदर**:—तुझ्यासाठीं नाहीं तो चहा.—आतां जा पाहूं.

**ऑथर**:—जातों—पण कुठं माहित आहे?—बाबुरावाला घेऊन येतों. ( जातो )

**सुंदर**:—काय मनुष्यस्वभाव आहे हा!—वीट आला या जगाचा. असं वाटतं, सरळ जावं अन् कुठं तरी हिमालयांत जाऊन राहावं.

**रजनी**:—मग माझ्यासारख्यांचं काय?—तुमच्यासारखीं माणसं जर हिमालयांत जाऊन बसूं लागलीं, तर आम्हांला मार्ग कोण दाखवील?

**सुंदर**:—कुणाला मार्ग दाखवायचा मला काय अधिकार? कोण मी? कां कुणी माझं ऐकावं? मळलेली वाट सोडून काट्याकुट्यां-तून मी मार्ग काढूं पाहातोंय, त्यांत दुसऱ्यांना दिखील मी कां खेचूं?

**रजनी**:—पण ज्यांना तेंच आवडतं—कांटेरी मार्गच आवडतो, त्यांची काय वाट?—त्यांना अर्ध्या वाटेवर सोडून जाणार तुम्ही? आणि कां?—कुत्सित लोक कुजकं बोलतात म्हणून?

**सुंदर**:—पण ते बोलतात ना? त्याचे घाय बसतात ना?—जखम होते जिवाला—रक्त वाहातं त्यांतून—तें नाहीं सहन होत. माझा मीच असतों, तर पर्वा केली नसती; पण तुझ्या सारख्या बायकांच्या अब्रूवर मारा करतात—

**रजनी**:—आम्हीं कुठं त्याची पर्वा करतों. कलेसाठीं त्याग नको का करायला?

**सुंदर**:—अब्रूचा त्याग?

**रजनी**:—नव्हे—अब्रू जाईल या खोट्या भीतीचा त्याग.

**सुंदर**:—शाबास रजनी. अशी शिष्या पाहिजे मला. तुझ्या-

सारखीं—कलेसारखीं चार जिव्हाळयांचीं माणसं मला आधार देतील तर कलेच्या जोरावर हें जग जिंकून दाखवीन.

**रजनीः**—मग आहों ना आम्हीं ?—आमचा धीर सुटला नाहीं ना ? मग तुम्हीं कां खचतां ?

**सुंदरः**—खचत नाहीं रजनी, मी खचत नाहीं. मला भीती वाटते. —तुम्हां लोकांच्या अब्रूची भीती वाटते. हें कलाकाराचं जीवन— सदा रहस्यमय. जितकं उघडं तितकंच झांकलेलं. वावरत्या जगाला या जीवनाची ओळख नाहीं. या अनोळखीचा परिणाम होतोय् हा.

**रजनीः**—जगाला आपण आपल्या विश्वासांत घेऊं.

**सुंदरः**—फार कठिण आहे तें !

**रजनीः**—कां ?

**सुंदरः**—कां ! कसं सांगू तुला !

**रजनीः**—काहीं नका सांगूं ! कशाला ती चर्चा ? या असल्या चर्चा करित बसण्यानंच कार्याला अडथळा होतो.

**सुंदरः**—खरं आहे तें.—पण माझीच चूक झाली आजवर. चर्चा करीत बसलों—हुज्जत घातली या लोकांबरोबर, त्यामुळं कुटाळकी करायला यांना साधन मिळालं.—पण त्यावेळीं दुसरा उपाय नव्हता. ती हुज्जत घातली नसती तर आज तुमच्यासारख्या शिष्यिणी मिळाल्या नसत्या !—( सुस्कारून ) दुःख वाटतं एकाच गोष्टीचं, कीं कुणि शिष्य मिळत नाहीं मला !

**रजनीः**—अजून भेद आहे मनांत ?

**सुंदरः**—भेद ? कसला भेद ?

**रजनीः**—स्त्री-पुरुष—भेद. जातीचा अभिमान आहे मनांत— पुरुष-जातीचा अभिमान ! होय ना ? पुरुष शिष्य हवा ! असंच ना ?

**सुंदरः**—माफ कर रजनी. ( बाजूला जाऊन बसतो. रजनी उठते आणि फळयावरील चित्राकडे पाहात राहाते. तो पुनः रजनीकडे येतो. ) रागावलीस रजनी ?

**रजनीः**—नाहीं. मला वाईट वाटलं. कां ही अशी नजर ? तुम्हीं—तुम्हींसुद्धां असं कां म्हणावं ? मग लोकांना कशाला दोष द्यायचा ? लोक निंदा करूं लागतात ते याच वृत्तीमुळं. नाहीं ?

ही वृत्ती तुमच्या हृदयांत नको होती.—नाहीं !

**सुंदरः**—आतां किती लाजवशील मला ! तूं—कल्याणी—त्या मंदा-कुंदा—साऱ्याच तुम्हीं माझा अभिमान धरतां—झगडतांहां माझ्यासाठीं—नि मी शिष्य हवा म्हणतों ! माफ कर रजनी, मी महा अपराधी आहें. म्हणूनच मला यश येत नाहीं. हा स्त्रीपुरुष भेद आधीं गेला पाहिजे मनांतून. कृतघ्नपणाचं बक्षिस मिळतंय् मला.—सांपडलं—यशाचं वर्म सांपडलं आतां. किती आंधळा होतों मी ! ( कल्याणी येते ) ये—कला. ( रजनीला ) मला क्षमा कर. ( कल्याणीला ) कुठं चुकत होतं माझं तें कळलं मला.

**कल्याणीः**—काय चुकत होतं कुठं ?

**सुंदरः**—कुठंही चुको—कांहींही चुको—तो भेद आतां गेला—पार धुऊन पुसून नाहींसा झाला. ब्रह्मदेवाला जें साधलं नाहीं तें आतां प्रत्यक्ष करून दाखवतों. ( तो बाजूला बसतो. कल्याणी रजनीकडे पाहत राहाते—रजनी नुसती हळूच हंसते. कल्याणी सुंदरच्या खुर्चीमागें उभी राहून बोलते )

**कल्याणीः**—ब्रह्मदेवावर मात करणार ?

**सुंदरः**—हो.

**कल्याणीः**—कशी ?

**सुंदरः**—( हंसतो ) आतां पहा !

**कल्याणीः**—( क्षणभर थांबून ) चित्रं गेलीं ना पारिसला ?

**सुंदरः**—केव्हांच.

**कल्याणीः**—स्वीकारलीं ?

**सुंदरः**—कुणाला माहित ! आतां पर्वा नाहीं मला !

**कल्याणीः**—मग पाठवलींत कां ?

**सुंदरः**—तेव्हां मूर्ख होतों मी.

**कल्याणीः**—आतां अक्कल आली ? होय ?—कुणी दिली ?

**सुंदरः**—रजनीनं.

**कल्याणीः**—अस्सं ? ( कांहीं वेळ सर्व स्तब्ध ) जाऊं मी ?

**सुंदरः**—मी बोलावलं नव्हतं तुला !

**कल्याणीः**—असं ?—मग कां आलें मी ?

**सुंदरः**—रजनीला विचार, ती सांगेल,—तिला चांगलं कळलंय् हें जगाचं कोडं !

**कल्याणीः**—होय रजनी ?—( रजनी उगीच राहाते. कल्याणी तिच्या जवळ जाते. ) होय रजनी ?

**रजनीः**—कां लाजवतां मला ? काय अपराध झाला माझा ? नुस्तं मी म्हटलं—( थांबते ).

**कल्याणीः**—काय म्हटलंस ?

**रजनीः**—स्त्री—पुरुष—भेद,—ही भेदाची भावना मारतेय् आम्हांला—आम्हां चित्रकारांना—( उठून जाऊन बाजूला बसते )

**कल्याणीः**—( आपल्याशींच ) स्त्री—पुरुष—भेद !—हा भेद गेला तर काय राहिलं या जगांत.

**रजनीः**—शून्य !

**सुंदरः**—शून्य ! कलाकार नवी सृष्टी निर्माण करतो ती शून्यांतूनच ! हा पत्ता अजून लागला नव्हता मला. ही वजाबाकी मला करतां येत नव्हती. पुरुषांतून स्त्री वजा दिली, कीं बाकी शून्य राहतं, हें मला कळलं नव्हतं. गणिताचं हें कोडं सुटलं, तेव्हांच जगाचं रहस्य माझ्या मुठींत आलं. आतां पहा, ती दैवी भावना विरून गेली. मी आतां दैत्य बनलों आहें. या दैत्य-पणाच्या जोरावर साऱ्या देवांना मी जिंकणार आहें. समजलीस ?

**रजनीः**—दैवी भावना विरून गेली !

**कल्याणीः**—दैवी भावना—प्रेमाची, शुद्ध प्रेमाची दैवी भावना ?

**रजनीः**—नव्हे—स्त्रीपुरुष-भेदाची भावना. देवानं निर्माण केलेली भावना. देवानं ती भावना निर्माण केली, माणसानं ती कवटाळली आणि तिथंच माणसाचा अधःपात झाला. देवाची भावना माणसाला कळली नाहीं. माणूस स्वतःला देव समजूं लागला, पण तो देव नव्हता—देव झालाही नव्हता—म्हणूनच त्याचा अधःपात झाला.

**सुंदरः**—अगदीं बरोबर. देवाची बरोबरी करूं लागला, हाच त्याचा अधःपात. माणूस देवापेक्षां फार मोठा. आपलं ठाण सोडून तो खालीं आला. त्यानं आपलं मोठेपण गाजवलं पाहिजे

होतं. देवांची हड्डी नरम करणारा दैत्य बनलं पाहिजे होतं—
**रजनी**:—नाहीं—
**सुंदर**:—नाहीं ? मग दुसरं काय गुरुमहाराज ?
**कल्याणी**:—आतां थांबवाल का हें ?—कसला विषय निघालाय् हा आज ?
**सुंदर**:—मोठा महत्त्वाचा विषय निघालाय् हा आज ! समजलीस कला ? सारं जग आपल्याकडे पाहूं लागलंय् ! माझ्याकडे—तुझ्याकडे—अन् हिच्याकडे !—अन् बोलूं लागलेयुत—गोड गोड बोलूं लागलेयुत. त्यांना गोडशीं उत्तरं दिलीं पाहिजेयुत ना ? त्याची चर्चा चाललीय् ही !
**कल्याणी**:—रजनी, हें आणखीन् कसलं वेड घातलंयस यांच्या डोक्यांत ? ( रजनी हंसते ) हंसतेस काय ? माझ्या आयुष्याचा नाश करायचा का विचार आहे तुझा ?
**सुंदर**:—पण माझ्या आयुष्याचं काय ?
**कल्याणी**:—माझं जीवन तें तुमचं जीवन—
**सुंदर**:—ही नुसती बोलायची भाषा आहे. पोपटपंची आहे ही. कुठल्या कुणा कवीनं लिहिलेलं भारूड कधीं पाठ केलं होतंस, त्याची ही उजळणी चालवलीय्स.
**कल्याणी**:—काय बोलतांहां हें ! बापाची सुद्धां मी पर्वा केली नाहीं, श्रीमंतीवर लाथ मारली, लक्षाधीशाची गृहिणी व्हायची संधि लाथाडून जी मी ही तुमच्या तोंडाकडे पाहात राहिलें, ती काय या शून्याच्या गोष्टी ऐकण्यासाठीं ?
**सुंदर**:—मी पाहिजे असेन तर तुला याच गोष्टी आतां ऐकाव्या लागणार. हें वेड आतां माझ्या नसानसांतून भिनून गेलंय्—अगदीं तक्षकाच्या विषासारखं. हें विष मला पचवायचं आहे—नीलकंठ बनायचंय् मला ! कुणाचा चावा घेतला मी, तर त्याला सुद्धां हें विष बाधेल, इतका विषारी बनलोंय् मी ! पत्करेल असला माणूस तुला ?
**कल्याणी**:—हो.
**सुंदर**:—' हो ' काय ? एवढं सोपं नाहीं हें मत. फार कठीण आहे—कलेपेक्षांही कठिण आहे.

कल्याणीः—जें तुम्हांला साधतं तें मला साधणार नाहीं ?

सुंदरः—तेंच आतां पाहायचंयू !

रजनीः—मी जातें आत्तां.

सुंदरः—आतां तूं घाबरलीस. गुरुदेवताच घाबरली तर शिष्य काय करणार ?

कल्याणीः—गुरूचा गुरू होणार !

सुंदरः—अगदीं बरोबर. ही माझी शिष्यीण, माझी गुरू झाली. आतां मी तिचा शिष्य—आतां मला गुरू झालं पाहिजे हिचा. हं, बैस तिथं. ( तिला कोचावर बसवून स्वतः जवळ बसतो ) तो बाबुराव शोधतोय ना तुला ? येऊं दे त्याला इथं—अन् पाहूं दे न् फजित होऊन जाऊं दे. तो ऑथर—(मोठ्यानें हंसतो ) लेखणीचे कोंबडे हे—उकिरडा टिपीत असतात नुसता. चोचीपायांनीं उकरीत असतात उकिरडा !—त्याला म्हणावं, रत्नं उकिरड्यांतच सांपड-तात. एकदा पहा उकरून हा उकिरडा !—( बळवंतराव येतो ) यावं तुम्ही आर्टिस्ट, कुठं हरवली तुमची बायको ?

बळवंतः—अगदीं असुक हाच प्रश्न केलास कीं !—

सुंदरः—मला वाटलंच तें. माझीच बहिण ती—माझ्यासारखीच माथेफिरू. म्हटलं, गेली असेल कुठं भटकत अन् तूं राहिला असशील तिला शोधित.

बळवंतः—अगदीं बरोबर बोललास. पण आतां तूंच सांग, हें बरं का ? बायकांच्या जातीला हें शोभतं का ?

सुंदरः—मी कसं सांगूं ? मी कांहीं बायकांच्या जातीचा नाहीं. पुरुषांचा प्रश्न असता तर मी सांगितलं असतं, कीं पुरुषाला वाटेल तें शोभतं. बायकांच्या जातीबद्दल या बायकांना विचार.

कल्याणीः—पुरुषांना शोभतं तें बायकांना कां शोभूं नये ?

बळवंतः—आतां ऐका. अन् हीच बोलतेयू ! तरी अजून लग्न झालं नाहीं. अन् रजनी !—छेः छेः—हें बरं नव्हे. किती खेटून बसलीयस ही ! लग्नाच्या बायकोला हें शोभत नाहीं. आम्हीं आपलीं घरचींच माणसं म्हणून बरं, दुसरा कुणी असता तर काय म्हणाला असता ?

रजनीः—म्हणाला असता कांहींतरी.—मला नाहीं त्याची पर्वा! आपलं मन शुद्ध असलं तर जगाच्या म्हणण्याची पर्वा कशाला करायची?

बळवंतः—फार तोंडं सुटलीं आहेत हल्लीं तुम्हां बायकांचीं.

सुंदरः—नुकतंच तोंडाचं कुलुप उघडलंय् कीं नाहीं!—

बळवंतः—अजून कुठं उघडलंय् पुरतं?—

सुंदरः—तोंच एव्हढी बडबड! गंमत आहे नाहीं? पुनः जाम करून टाकलीं पाहिजेत हीं कुलपं!—नाहीं?—

बळवंतः—माझी परीक्षा पाहातोय्स पण मी फसायचा नाहीं बरं!

कल्याणीः—अस्सं? मग एव्हढे उतावीळ कां होतां? जरा कुठं बिचारी इकडे-तिकडे गेली, तर एव्हढा जीव कां खालींवर होतो तुमचा?

बळवंतः—नवऱ्यांचीं दुःखं नवऱ्यांना माहित!

सुंदरः—ऐक कला, म्हणूनच मी म्हणतों—( थांबतो )

बळवंतः—काय म्हणतोस?

सुंदरः—अजून वेळ आली नाहीं तें काय तें सांगायची.

बळवंतः—प्रत्येक जण कोड्यांत बोलतोय्—( कुंदा मंदा येतात ) आतां ह्या असल्या चिमुरड्या पोरीसुद्धां तत्त्वज्ञानाच्या गोष्टी बोलूं लागल्यायुत.

मंदाः—ऐकलंत मास्तर!—

कुंदाः—थांब, आधीं मी सांगतें.

मंदाः—नाहीं. मी आधीं सांगणार—( दोघी पुनः पुनः 'आधीं मी सांगणार' म्हणतात. कल्याणी त्यांना दूर करते. )

कल्याणीः—हें पहा—दोघीही एकदम सांगा—

मंदाः—असं कसं होईल? शब्द कसे जमतील?

सुंदरः—नाहीं का जमेनात!—आम्हांला ऐकूं येतंय् ना? हं सांगा.

मंदाः— } बाबा म्हणतात, तुझ्या मास्तरनां माणुसकी नाहीं.
कुंदाः— } बाबा म्हणतात, सच्चा माणूस आहे तुझा मास्तर!

कल्याणीः—कळलं?—काय हो बळवंतराव!

**बळवंतः**—हो कळलं !—( घोंटाळतो )

**सुंदरः**—काय कळलं ?

**बळवंतः**—हिचे बाबा म्हणतात, सच्चा मास्तरनां तुझी माणुसकी नाहीं ! काय ग, असंच ना ? ( दोघी हंसतात ) चुकलं वाटतं !—एव्हढं खरं, माणुसकीबद्दल कांहीं तरी असावं !

**रजनीः**—दोन माणसं एकदम बोललीं तर ऐकणाराचा एव्हढा घोंटाळा उडतो, मग सारं गांव जेव्हां एकदम बोलूं लागतं तेव्हां विपर्यास झाला बोलण्याचा म्हणून कां कुणी तक्रार करावी ?

**सुंदरः**—माणुसकी ! माणुसकी !—

**कुंदाः**—माणुसकी म्हणजे काय हो मास्तर ?

**सुंदरः**—त्याचाच विचार करतोंय् मी !

**मंदाः**—सच्चा माणूस म्हणजे काय—नि दुसरा कसला हो मास्तर ?

**सुंदरः**—थांब—तूं आर्टिस्ट आहेस ना बळवंतराव ?—

**बळवंतः**—मी कसला आर्टिस्ट ! आपला एक जुन्या काळचा चित्रकार आहे झालं !—

**सुंदरः**—ठीक—ठीक—जुन्या काळच्या नि नव्या काळच्या कल्पना कशा काय मिळतात पाहूं. एक चित्र काढ पाहूं माणसाचं ! ( बळवंतराव हंसतो ) हंसूं नकोस. मोठी कठीण कल्पना आहे ही ! माझं देखील डोकं पिकलंय् या कल्पनेमुळं—मी सुद्धां प्रयत्न करून पाहातों. हं हा घे फळा—अन् मंदा, आम्हीं हें चित्र काढीपर्यंत एक सुंदरसं गाणं म्हण.

( दोघे चित्र काढूं लागतात. दोघीही त्यांच्यामागें उभ्या राहून पहातात. मंदा आणि कुंदा पाहात पाहात खालील गीत गात असतात. )

**गीत** ( कवि राजा बढेकृत )

**संभाळ गडे संभाळ, पाहुं ये लपुनी ।**
**उपसली कुंचली पहा कलावंतानीं ॥**
**हें पाप उभें बघ गिळायास तुज रसिका ।**
**गुणग्राहकतेची भरली तुझिया घटिका ॥**
**रंगांत डुंबता अंगीं भिनले वारे ।**
**ते उभे आडवे कुंचलिचे फटकारे ॥**

घेतील सहज ते अतां कलेचा प्राण।
ये कलेवरातें कले-वरतिही मान ॥
चळचळा कापते कला, कोण तिज तारी।
कोठली कला ग ?-खोकलाच हा भारी ! ॥

**बळवंतः**—( चित्र दाखवित ) हें पहा !—

**सुंदरः**—जरा थांब—हं मंदा, थांबू नकोस !—( पहायला येऊं पाहाणाऱ्या बळवंतरावाला दूर लोटित ) हं ! हं ! एव्हां नाहीं पाहायचं हें चित्र !—

( तो चित्र काढीत असतां कल्याणी व रजनी एकमेकांना खुणावून हंसत असतात. बळवंतराव अस्वस्थपणें दूर एका खुर्चीवर बसतो.)

**सुंदरः**—हं—आतां पहा.

**बळवंतः**—तूंच पहा !—

**सुंदरः**—( त्याच्या जवळ जाऊन ) रागावलास ?

**बळवंतः**—आतां आलं माझ्या ध्यानांत. या बायकांसमोर माझी फजिती करायचा बेत आहे तुझा.

**सुंदरः**—छे छेः—फजिती झाली तर माझीच होईल.

**बळवंतः**—मला सांगतोस हें ! या तुझ्या शिष्या-साऱ्या तुझ्या वळणाच्या-तुझ्या तालमींतल्या—चुकलंच तें, मी पुसूनच टाकतों तें चित्र !—( उठतो—वाटेंत सुंदर त्याला अडवून आपल्या चित्रापुढें नेऊन उभा करतो ) हें काय ?—हा माणूस ? ( हंसत सुटतो ) हा माणूस ? मग तुम्हीं-आम्हीं कोण ?

**सुंदरः**—तुम्हीं आम्हीं—म्हणजे तूं नि मी. या बायकांना गुंतवूं नकोस या भानगडींत !—

**बळवंतः**—म्हणजे ?

**सुंदरः**—( त्याच्या चित्रापुढें त्याला ओढून ) हा माणूस ना तुझा ? —मग याचा काय संबंध आहे या माणुसकींत ? माणूस म्हणजे पुरुष ! होय ना ?

**बळवंतः**—पुरुष ?—काय म्हटलंस, माणूस म्हणजे पुरुष !

**रजनीः**—अन् आम्हीं नव्हे वाटतं माणसं ?

**बळवंतः**—( जरा सावरून ) पण हें काय ? पुरुषही नव्हे—स्त्रीही

नव्हे—इतकंच नव्हे तर माणूसही नव्हे—शिंगं कशाला या माणसाला ?

**सुंदरः**—रोंखायला !—दुसऱ्यावर रोंखून त्याचं पोट फाडायला !

**बळवंतः**—सैतान आहे हा विलायती !

**सुंदरः**—विलायती नव्हे, हा अगदीं आपला आहे—अगदीं आर्यावर्ती माणूस आहे. हा आर्यावर्ती माणूस विलायतेला गेला, बायबलांत शिरला, नंदनवनांत धुमाकूळ माजवून यानंच माणुसकीची पुरुषकी केली ! तो हा आदिमानव ! आदिदेवाचं—महादेवाचं चित्र आहे हें !

**बळवंतः**—महादेव म्हणजे कांहीं माणूस नव्हे. हें असलं विचित्र ध्यान जर कुणी पाह्यलं—( विश्वासराव येतो ) या विश्वासराव, पहा, हा सुंदरचा माणूस पहा.

**सुंदरः**—नि हा बळवंतरावाचा माणूस पहा. याच्या माणुसकींत स्त्री येत नाहीं.

**विश्वासः**—स्त्रियांना कुठं असते माणुसकी !

**रजनीः**—ऐक कला, कलाकार बोलतोय् हें. अन् हे आमचे कैवारी !—

**विश्वासः**—अरे राहूं द्या हीं चित्रं सध्यां—(रजनीस) इथं आहेस ना तूं ? ठीक. तो बिचारा बाबुराव तिकडे घायाळ होऊन पडलाय्—

**रजनीः**—काय झालं ?

**विश्वासः**—तसं कांहीं विशेष नाहीं. साधीच आहे जखम !

**रजनीः**—जखम ! कसली ? कुठं लागली ?

**विश्वासः**—( छातीला हात लावून ) इथं !

**रजनीः**—( घाबरून ) अगबाई !

**विश्वासः**—दिसण्याजोगी नाहीं—आंत झाली आहे जखम. साधी—अगदीं साधी, मोटारीची नव्हे—ट्रॅमची नव्हे—बसची नव्हे—चाकूसुरीची सुद्धां नव्हे—( थांबतो )

**रजनीः**—मग कसली ?

**विश्वासः**—कर्माची ?

**रजनीः**—कसल्या कर्माची !

**विश्वासः**—तुझ्या कर्माची !—लाज नाहीं वाटत ? परक्या माणसाबरोबर फिरतेस एकटी—नवऱ्याला टाकून फिरतेस !—तो बिचारा तळमळतोय ! त्या ऑथरनं सांगितलं.—

**रजनीः**—अस्सं !

**बळवंतः**—अस्सं म्हणे ! काय झाली त्याची चूक ? ऑथर आहे तो. त्याला जगाकडे पाहातां येतं. त्याला जग जसं दिसतं तसं तो जगाला सांगतो—

**रजनीः**—त्याला जसं दिसतं तसं तो सांगतो ! पण त्याला दिसतं तें बरोबर असतं का ?

**कल्याणीः**—बोला ना ? कुणाच्या पाहाण्यावर विश्वास ठेवायचा ? कॅमेऱ्याच्या कीं आर्टिस्टच्या ?

**विश्वासः**—हें पहा, असा आरडाओरडा करूं नका. आरडून ओरडून कांहीं मुद्द्याचं समर्थन होत नाहीं. तुम्हीं या बायका, आपला नवरा धरून राहाणं हें तुमचं कर्तव्य, तुम्हांला कशाला या कला हव्यात ?

**बळवंतः**—कलेच्या नांवावर हव्या त्या माणसाबरोबर हवा तसा धुमाकूळ घालायला ! म्हणूनच मी आपली एक साधी बायको पत्करली—

**विश्वासः**—पण ती तरी कुठं आहे तुझ्या ताब्यांत ? ती तिकडे फिरते आहे एका कलावंताबरोबर !

**बळवंतः**—कुणाबरोबर ?

**विश्वासः**—बाबुरावाबरोबर.

**बळवंतः**—बाबुरावाबरोबर ?—बाबुरावाबरोबर !—कुणी सांगितलं ? अन् तो कुठं आहे कलावंत ?

**विश्वासः**—ऑथरनंच सांगितलं. गातो ना तो बाबुराव ? गाणं ऐकत बसली असेल त्याचं, तोंवर त्याची बायको ही इथं काढतेच आहे कीं चित्रं ! माणूस म्हणे !

**सुंदरः**—तिचं नव्हे तें चित्र.

**विश्वासः**—काढलं नसेल—बघत राहिली असेल. एकूण एकच. बरं झालं माझ्या बायका मेल्या त्या. हे जंजाळ तरी नाहींत मला.

मंदा—ऐकलंत का मास्तर—

**विश्वासः**—अन् या एवढ्याशा पोरी—यासुद्धां इथंच ?

**कल्याणीः**—कांहीं काळीज आहे का तुम्हांला ? कीं नजरेंत नुसतं पापच भरलंय् ? ही वृत्ती तरी काय ? कुणी कुठं येऊं नये, जाऊं नये, कुणाशीं बोलूं नये, चालूं नये, असं का तुमचं म्हणणं ?

**विश्वासः**—कुणी नव्हे—बायकांनीं. कुणाशीं नव्हे—पुरुषांशीं. समजलं ?

**नटः**—( प्रवेश करून ) स्त्रीजात तेवढी बेहराम !

**सुंदरः**—हं हं थांब. तुला कां आली ही कळ एकदम ?

**नटः**—काय करूं रे ! अंतःकरणाचा कसा भडका उडतो आहे. दुसऱ्याचं दुःख तें आपलं दुःख. दुसऱ्यासाठीं–माझ्या मित्रासाठीं—माझ्या गुरुदेवतेसाठीं मी तळमळूं नये अं ?

**रजनीः**—कोण तुमची गुरुदेवता ?

**नटः**—तूं—

**रजनीः**—मी ?

**नटः**—थांब—ऐक—तूंच या साऱ्या दुःखाचं मूळ ! माझा मित्र—माझा गुरू—माझा बाबुराव—तिकडे तळमळतो आहे—

**विश्वासः**—रमणीला बरोबर घेऊन—

**नटः**—ऐक. आधीं ऐक—नीट ऐक—

**बळवंतः**—रमणीला बरोबर घेऊन ?

**नटः**—ऐका म्हणतों ना !—आणि त्याचवेळीं ही इथं—

**बळवंतः**—कुणी सांगितलं तुला—

**नटः**—कवीनं—त्या अतींद्रिय द्रष्ट्यानं जगाकडे नजर फेकली. त्या दृष्टीच्या चक्रांत त्याला दिसून आलं—( कुंदा मंदा हंसतात ) हंसूं नका वेड्या मुलींनों, हंसूं नका.—ही हंसण्याची गोष्ट नव्हे. रक्ताचे अश्रू गाळतं आहे त्याचं कोमल हृदय. त्या रक्ताचे फवारे या जगाच्या मार्गावर उधळले आहेत. त्या फवाऱ्याच्या वर्षावानं हे जग धगधगूं लागलंय् !—ऐक कुंदा—

**नटः**—हं, थांबा—काय म्हणत होतों मी !—

**सुंदरः**—कांहीं म्हणूं नकोस—चालता हो इथनं. उकिरडा उपसताहेत एकेक जण. केवढी ही जगाची उठाठेव !

**नटः**—ऐक—पुढं ऐक—

**सुंदरः**—निघ इथून—नाहींतर धक्की मारून बाहेर काढीन.

**नटः**—हरहर ! हे स्वर्गस्थ देवतांनो !—

**कुंदाः**—यांच्या हाकेला ओ द्या हो !

( सर्व हंसतात—नट घबराट होतो, इकडे तिकडे पाहातो आणि ' सूड—सूड—सूड ' म्हणत निघून जातो )

**कुंदाः**—काय एकेक वेडं आहेत हीं ?

**मंदाः**—अन् या माणसांची तारीफ येते वर्तमानपत्रांतून !

**विश्वासः**—गप्प बसा. मोठ्या माणसांच्या बोलण्यांत पोरापोरींनीं तोंड घालूं नये. बरं सुंदर—( थांबतो ).

**सुंदरः**—काय ?

**विश्वासः**—मला वाटतं, तूं हा क्लास बंद कर.

**सुंदरः**—आणि जगूं कशावर ?

**विश्वासः**—चित्रं काढ जरा माणसासारखीं. हा असला ( फळा दाखवून ) चावटपणा सोडून दे. हा तुझा मेव्हणा, केविलवाणं तोंड करून बसलाय्. कां ?—काय कारण झालं ? कुठं आहे त्या कारणाचा उगम ? याचा आधीं विचार कर अन् ही रासक्रीडा बंद कर बाबा !

**सुंदरः**—संपला उपदेश ?—या, नमस्कार !—

**विश्वासः**—अरे पण—

**सुंदरः**—नमस्कार. ( बाबुराव व रमणी येतात ).

**विश्वासः**—या बाबुराव—ही पहा तुमची—

**बळवंतः**—( रागानें ) कुठं गेली होतीस याच्याबरोबर ?

**बाबुरावः**—( रजनीला ) इथं काय करीत होतीस ?

**रजनीः**—एकटी नव्हतें मी इथं !

**बळवंतः**—( रमणीला ) आजपासून हें घर तुला बंद—

**रमणीः**—माझ्या भावाचं घर ?

**बाबुरावः**—कसला आलाय् भाऊ ? कोण नाहीं कुणाचा भाऊ

नि कोण नाहीं कुणाची बहीण. ही देखील नातं जोडते भावाचं—नि गुरूचं—नि आणखी कसलं तरी !—चोर सारे—हरामखोर ! कलेच्या नांवाखालीं धुडगुस मांडला आहे बेट्यांनीं. नागव्या-उघड्या गोळा करायची संवय लागलेली, नीति कशी राहील शाबूत असल्या चाळ्यांनीं ? पुरे झाली ही कला ! आजपासून ही कला बंद. कळलं ? चित्रं काढायचीं नाहींत.—नागवीं नकोत नि नेसलेलीं नकोत. सारं कांहीं बंद !—चल.

**रजनीः**—मी नाहीं येत.

**बळवंतः** चल तूंही !

**रमणीः**—मला बोलायचंय् माझ्या दादाशीं.

**बळवंतः**—दादा गेला अस्मानांत ! चल निघ. नाहींतर—नाहींतर—अन् तुम्हींही चला ग पोरींनो आपापल्या घरीं.

**मंदाः**—तुम्हीं कोण आम्हांला सांगणार ?

**कुंदाः**—आम्हीं जाऊं नाहींतर राहूं. काय वाटेल तें करूं !

**बाबूरावः**—( रजनीला ) पाहिलंस ? हें तुमचं शिक्षण. तुमचं वर्तन पाहून या पोरीसुद्धां बेमुर्वत बनल्या. चल, येतेस कीं नाहीं ?

**रजनीः**—नाहीं येत.

**विश्वासः**—हें बरं नव्हे बरं. फार वाईट परिणाम होतील याचे.

**रजनीः**—काय व्हायचं तें एकदां होऊन जाऊं दे. कुणी यायचं नाहीं आमच्यापैकीं ! जा.

**बाबुरावः**—असं काय ?

**बळवंतः**—अऽस्सं काय ?

**विश्वासः**—आतां बघा—

**बाबुरावः**—चला विश्वासराव—चला बळवंतराव—आतां तडीलाच न्यायचं हें प्रकरण !—ऐकलंस सुंदर, तोंड दाखवायला जागा ठेवणार नाहीं तुला. चला. कशा यांच्या गमजा उतरतों तें तरी पहा. ( तिघे जातात )

**सुंदरः**—( एकदम कोसळून पडतो ) नको—नको हें जिणं !

**कल्याणीः**—तुम्हीं म्हणतां असं ?

**सुंदर**ः—किती सहन करूं ? मर्यादा आहे ना सहनशक्तीला ? किती सहन करील ही माणसाची कातडी ?

**रजनी**ः—पण आमची तयारी आहे ना ?

**सुंदर**ः—खोटं आहे तें ! वाटतं तितकं सोपं नाहीं हें. बस्स झालं ! असं वाटतं—

**कल्याणी**ः—कांहीं नाहीं वाटत ! काय व्हायचंय् तें होऊन जाऊं दे. कांहीं पर्वा करायची नाहीं कुणाची !

**सुंदर**ः—कारण एक—स्त्री-पुरुषभेद. कुठल्या चांडाळानं हा भेद निर्माण केला ?—

**रमणी**ः—दादा, तूं बोलतोस हें ? तुझ्यासारखा धीराचा माणूस-

**कल्याणी**ः—पुरे झालं. मंदे—कुंदे—एक गोडसं गाणं म्हणा पाहूं—( मंदा, कुंदा गाऊं लागतात )

**गीत**—( कवि राजा बढेकृत )

**आला बघ संधिकाल ।**
**उधळित वरती गुलाल ।**
**उजळ तुझी दीपमाळ रजनि भाग्यशाली ॥**
**रंग रंग वेगळे ।**
**कळी कळी पहा खुले ।**
**खोडसाळ हा वसंत हंसत भोंवतालीं ॥**
**कुणि गडे चितारलीं ।**
**चिंतनें मनांतलीं ।**
**नयनिं रंगली दिसे उमटलीहि गालीं ॥**
**ललितलता नवललना ।**
**छळसि काय रे पवना ॥**
**रे मदना, थांबिव ना ! ठेव धनू खालीं ॥**

( पडदा )

# अंक तिसरा

[ सुंदररावाचा स्टूडिओ—पडदा वर जातो तेव्हां सामान झाडीत असलेला कृष्णा आंत निघून जातो. बाहेरच्या दरवाजानें रजनी येते आणि तशीच आंत जाते—एक क्षणभर कुणीच नसतें. नंतर कल्याणी येते. स्टूडिओंत कुणी नाहीं असें पाहून आंतल्या दरवाज्यांतून आंत डोकावून ' रमणी ' म्हणून हांक मारते—आंतून कुणीच ' ओ ' देत नाहीं. आंत जाऊन पहावें असा विचार करीत पुन्हां मागें फिरते आणि बाहेर जाऊं लागते, तोंच बाहेरून येत असलेली रमणी तिला दारांत भेटते. रमणीच्या हातांत एक भरलेली पिशवी आहे. त्यांतून बाहेर भाजी डोकावलेली दिसत आहे. ]

**रमणी**:—केव्हां आली होतीस ?

**कल्याणी**:—ही आत्तांच आलें. हांका मारल्या तुला पण आंतून कुणीच ओ देईना. कृष्णासुद्धां नाहीं वाटतं घरांत ! असं घरदार उघडं टाकून जातां, उद्यां जर चोरी झाली—

**रमणी**:—कसली व्हायची चोरी ?

**कल्याणी**:—कां बरं ? हीं इथलीं चित्रं काय कमी मोलाचीं आहेत ?

**रमणी**:—पण हीं धुडं घेऊन कुठला चोर जायला बसलाय ? अन् कुणाला पचायची आहे ही असली चोरी ? दाणागोटा म्हणायला हा रोज असा आणावा लागतोय. कपडालत्ता देखील तेवढ्यापुरताच. काय मिळणार आहे इथं चोराला या चारुदत्ती राज्यांत ?—थांब हं. एवढं ठेवून येतें आंत.

**कल्याणी**:—मीही येतें आंत. [ दोघीही आंत जातात ]

[ विश्वासराव आणि बळवंतराव येतात. विश्वासराव बळवंतरावाला खेंचून आणीत असावा आणि बळवंतराव मोठ्या नाखुषीनें येत असावा असें वाटतें ]

**विश्वास**:—ये—बैस इथं. अरे तरणींताठीं माणसं तुम्ही, असं किती दिवस रुसून बसणार ? माहेरपण झालं म्हणावं अन् घेऊन

जावं तिला. माहेरीं आलेली बायको कांहीं बोलावल्याशिवाय जायची नाहीं नवऱ्याकडे. जुन्या काळचा शिरस्ता आहे तो. तेव्हां बोलावणं हें धाडलंच पाहिजे. इथल्याइथंच आहांत, तेव्हां स्वतः येणं हा उत्तम मार्ग! काय?

**बळवंतः**—वडील माणसांचा शब्द मोडूं नये म्हणून आलों; पण तुम्हाला सांगतों विश्वासराव, पुन्हा तिचं तोंड पाहायचीसुद्धां माझी इच्छा नाहीं. बाबूरावानंसुद्धां तसाच निश्चय केलाय. चढेलपणालासुद्धां कांहीं मर्यादा आहे ना?

**विश्वासः**—अरे चाललंच आहे. अरे हा प्रेमकलह आहे बाबा. सदा कलहाविना—मना न ये नेम सुनें गमे प्रेम. भांडणाशिवाय प्रेमाला लज्जत येत नाहीं! आतां भांडायचं तेवढं भांडून झालं. प्रश्न आहे तो हाच, कीं पड कुणी खायची?

**बळवंतः**—हो!

**विश्वासः**—बरोबर आहे. मान दोघांनाही आहे—तसं पाहिलं तर मस्ती दोघांनाही आहे.

**बळवंतः**—हं! हं! हें नाहीं मला कबूल.

**विश्वासः**—नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं.—मस्ती दोघांनाही आहे—जरा थांब, आधीं ऐकून घे, त्या कुणी असल्या समोर तर असं नाहीं म्हणायचा मी! ही आपली खासगी चर्चा आहे. या खासगी चर्चेंत खऱ्या गोष्टी कबूल करायला हव्यात. समजलास? म्हणूनच मी आलोंय. कुणीच पड खायला नको तुम्हांपैकीं. मी घेतों सारी मिटवामिटव करून. तो बाबूरावसुद्धां मिळायला पाहिजे होता—पण म्हटलं, सध्यां एवढं हें एक प्रकरण तरी मिटवून घेऊंया.

**बळवंतः**—तुम्हाला मी पुन्हां सांगून ठेवतों, आपखुषीनं कांहीं मी इथं आलों नाहीं. तुम्ही सक्तीनं मला इथं आणलंत, वडील माणूस म्हणून मी तुमचं ऐकलं न् आलों, बस्स, इथं तुमची वडीलकी संपली, आतां माझा मी मुखत्यार आहें. यापुढं मात्र मी तुमचं कांहीं ऐकणार नाहीं.—

**विश्वासः**—बरं. बरं. तें पुढचं पुढं पाहूं. माझ्या शब्दासरशीं

आलास—माझा बोज ठेवलास—यांतच मला आनंद आहे. अरे आमचे संसार कोसळले, म्हणून तुमचा संसार तरी थाटला राहावा असं वाटतं आम्हा लोकांना. तो सुंदर एक मूर्ख माणूस आहे. त्याच्यापायीं तूं कशाला स्वतःला त्रास करून घेतोस ?

बळवंतः—( इकडे तिकडे पाहून ) इथं नाहीं वाटतं तो ! सर्वांनांच त्याच्यापायीं त्रास झालाय. तो आहे फकीर, आम्हीं संसारी माणसं—पण याच्या मूर्खपणापायीं आमचे संसार कोसळून पडताहेत, मग त्रास करून घ्यायचा नाहीं तर काय करायचं ?

विश्वासः—स्वतःला त्रास करून घेऊन कांहीं त्याला शिक्षा लागत नाहीं ! त्याचं ठीक चाललंय. संप्रदाय वाढत चाललाय त्याचा. गोकुळ थाटलंय बेट्यानं. आतां तुम्ही जर असे स्वस्थ बसून राहिलांत तर नुकसान कुणाचं होईल ? म्हणून मी म्हणतों—( आंत कांहीं तरी पडल्याचा आवाज होतो आणि दोघेही घाबरून उभे राहातात ) काय झालं ?

बळवंतः—काय झालं ? ( कृष्णा आंतून बाहेर येतो आणि तडक त्यांच्या अंगावरून बाहेर जाऊं लागतो. त्याच्या हातांत एक फ्रेम असते ) तूं का तो ?

कृष्णाः—( बाहेर जातांना दाराजवळ थांबून ) कुणाला हटकतासा ?

विश्वासः—तुला—तुला ! दिसत नाहीं तुला आम्ही इथं आहोंत ते ? तडक चालला अंगावरून ! जसा कांहीं बाजीरावाचा बेटाच.

कृष्णाः—हां ! हां ! मी आतां तवाचा त्यो न्हाह्यलों नाहीं. भारी मोठा माणूस झालोंय मी. समजलं ?

विश्वासः—पाहिलं मोठ्या माणसाचं तोंड. कुठं गेलाय तुझा शेट ?

कृष्णाः—कुठला शेट ? मीच हाय इतला शेट. रोज रोज किती सांगायचं तुमास्नी ?—( असं म्हणून निघून जातो ).

बळवंतः—जसा धनी तसा नोकर. धन्याला अक्कल नसली कीं नोकर मिजास दाखवूं लागतात ती ही अशी !—कुणी नाहीं वाटतं इथं ! सारेच बाहेर गेलेले दिसतात ! आतां किती वेळ बसणार इथं ? ( बाबूराव येतो ) या—तुम्हीही आलांत वाटतं !

**बाबूराव**:—नाहीं—मी नाहीं आलों. शंभर वेळ कपाळ उठवलं या म्हाताऱ्यानं माझं. बायको बायको म्हणजे काय ? नुसत्या बायकोसाठीं मुंडी खालीं घालून आंवतण द्यायला येणं मला नाहीं पसंत. पण म्हटलं वडील माणूस आहे, बोलावतो आहे, बोज ठेवला पाहिजे ना ?

**विश्वास**:—बरी ' म्हैस ' बनवलंत मला !—म्हणजे जसा कांहीं माझाच आग्रह ! आणि तुम्ही नाहीं वाटतं आसावलांत बायकांसाठीं ?

**बाबुराव**:—कोण म्हणतं असं ?

**बळवंत**:—हं ! हं ! कोण म्हणतं असं ?

**विश्वास**:—( मोठ्यानें हंसत ) बरं बाबा, राहिलं. मीच म्हणतों म्हणा पण एकदां तुमचे संसार थाटूं द्या.

**बाबूराव**:—संसार थाटूं द्या म्हणे ! संसार थाटायला काय तीच बायको हवी आहे ? आतां एक डझन बायकांशीं लग्न करायची ताकद आहे मला—

**बळवंत**:—खरं आहे तें. एकीच्या जिवावर एवढी चैन चालली होती—डझनची बारापट !

**बाबूराव**:—आणि तूं ? तुझी मिळवती नाहीं ना ? म्हणून बोलतोयस असं.

**विश्वास**:—अरे आतां गप बसाल. इतक्यांत यायचं कुणीतरी. असं बसा पाहूं इथं—बसा—( त्यांना बळेंच बसवतो आणि आपणही बसतो. तोंच कल्याणी आंतून बाहेर येऊन तडक बाहेरच्या दरवाजाकडे जाते.) अग ए ! थांब ना. एवढा वेळ आंतच होतीस वाटतं ! काय चाललं होतं ? एकटीच होतीस कीं—एवढा वेळ आम्ही बाहेर बोलतों आहोंत तें ऐकूं आलं नाहीं वाटतं ?

**कल्याणी**:—( दाराजवळ थबकून मागें पाहून ) झालं ! बरं—येतें मी. ( एकदम जाते )

**बाबूराव**:—काय विलक्षण पोर आहे ! उत्तरसुद्धां दिलं नाहीं !

**बळवंत**:—आम्हीं इथं बसलों आहोंत, बोलतों आहोंत, आंत गडी होता, ही होती; पण कुणीच दाद घेतली नाहीं आमची !

प्रत्येकजण येतो आणि तडक निघून जातो. हा प्रकार संशयास्पद नाहीं वाटत तुम्हाला ?

**बाबूराव**:—आणखी कुणी आहे का आंत ? या. पाहूंया तर खरं.

[ तिघेही उठून हळूच आंतल्या दाराजवळ जाऊन डोकावूं लागतात तोंच बाहेरून सुंदर येतो. ]

**सुंदर**:—कोण आहे ? ( तिघेही दचकून मागें वळतात ) वाः विश्वासराव, काय चाललंय हें ! माझ्या गैरहजेरींत माझ्या घरांत शिरून—

**विश्वास**:—( मोठमोठ्यानें हंसत त्याच्यासमोर येऊन ) वाः सुंदरराव, इतकावेळ तुमचं घर संभाळलं आम्हीं—

**सुंदर**:—कुणी नको माझं घर संभाळायला. अन् तुम्ही हो, काय करीत होतां इथं तुम्ही ?

**बळवंत**:—आतां ऐका—ऐका विश्वासराव !

**सुंदर**:—काय ऐकायचं ? काय काम आहे इथं तुमचं ?

**बाबुराव**:—काय काम ?—सुंदरराव, माझी बायको कुठं आहे ?

**बळवंत**:—सुंदरराव, माझी बायको इथं आहे. केव्हां येणार ती आपल्या घरीं ?

[ सुंदरराव मोठमोठ्यानें हंसत एका खुर्चींत आडवा पडतो. ]

**बाबुराव**:—हंसायला काय झालं ? सरळ उत्तर द्या माझ्या प्रश्नाचं. कुठं आहे माझी बायको ?

**सुंदर**:—प्रत्यक्ष नवरा, आपल्याच बायकोचा पत्ता परकी माणसाला विचारूं लागला, कीं त्याला कांहींच उत्तर देऊं नये हेंच बरं.

**विश्वास**:—( एक खुर्ची ओढून सुंदररावाजवळ घेऊन बसत ) असं पहा सुंदर,—

**सुंदर**:—( ताड्कन उठून ) बस्स करा. कुणाचा कांहीं संबंध नाहीं माझ्याशीं. ज्यानं त्यानं आपली जबाबदारी पहावी. यांनींच त्यांना घालवून दिलं, वाटेल तिकडे जा म्हटलं; बिचाऱ्या बायका त्या, आज्ञाधारक असतात ना बायका ?—त्यांनीं आज्ञा पाळली यांची.

**बळवंतः**—आतां आज्ञा करतों आम्हीं पुन्हां—

**सुंदरः**—कुणाला ?

**बळवंतः**— } त्यांना—आमच्या बायकांना.
**बाबुरावः**— }

**सुंदरः**—मग करा कीं त्यांना आज्ञा. मला कशाला सांगतां ?

**विश्वासः**—असं पहा सुंदर, असं तेढं बोलूं नये. प्रसंगानं माणूस बावरून जातं, त्यावेळीं शहाण्या माणसानं सरळ वाटेवर आणलं पाहिजे त्याला. नवराबायकोंत असा बिब्बा घालणं बरं नाहीं.—कुठं आहेत त्या ? मी सांगतों त्यांना ! इथंच असतात ना त्या ?—हें बरं दिसतं का ? एक बहीण आहे तुझी—पण दुसरीचा तुझा काय संबंध ? कां इथं राहूं दिलीस तिला ?

**सुंदरः**—त्या इथं आहेत कशावरून ?

**बाबुरावः**— } आम्हाला पक्कं माहीत आहे !
**बळवंतः**— }

**सुंदरः**—म्हणूनच आंत डोकावून पहात होतां वाटतं ? ही चोरी कशाला ? मी इथं असतांना सरळ आलां असतां, सरळ सरळ मला विचारलं असतं, तर मी काय सांगायचं तें सांगितलं असतं. मी घरांत नाहीं असं पाहून चोरट्यासारखे आंत शिरलांत—

**विश्वासः**—बरं, बरं. ती चूक झाली आमची.

**सुंदरः**—मग भोगा त्या चुकीचीं फळं. आधीं माझ्या घराबाहेर व्हा.

**बाबुरावः**—जरा ऐकून तर घे.

**सुंदरः**—एक शब्दसुद्धां ऐकायचा नाहीं मला यावेळीं ! पुन्हा या. परत विचारा. मी घरीं असेन तेव्हां या. समजलं ? नमस्कार ! ( बोटानें दरवाजा दाखवतो. तिघेही कांहीं न बोलतां मुकाट्यानें निघून जातात ) कृष्णा ! अरे कृष्णा ! ( त्रासून मोठ्यानें ) कृष्णा ! गेला कुठं हा चोर !

( रमणी आणि रजनी आंतून बाहेर येतात )

**रमणीः**—काय दादा ?

**सुंदरः**—आंतच होतीस का तूं ?—( रजनीला ) अन् तूंही ?

**रजनी**:—( हंसून ) हो, मीही. अन् कल्याणीसुद्धां.

**सुंदर**:—कुठं आहे ती ? ( आंतल्या दरवाजाकडे जातो )

**रजनी**:—( हंसून ) आंत नाहीं बसली ती लपून. गेली आहे तुम्हांला शोधायला. हें त्रिकूट आलं होतं—

**सुंदर**:—त्यांच्यासमोरूनच गेली का ? कांहीं बोलाचाली तर झाली नाहीं ?

**रमणी**:—एक शब्दसुद्धां बोलली नाहीं ती. तडक निघून गेली त्यांच्या अंगावरून.

**सुंदर**:—( एकदम खुर्चीत बसून ) मला कां हा त्रास तुमच्यापायीं ? तुम्ही जा कशा आपल्या नवऱ्याकडे ! ( दोघीही हंसतात ) हंसायला येतं तुम्हाला ! पण लोकांच्या जिभेचे फटके खावे लागतायत मला. अन् ती एक—तीही तशीच हात धुवून पाठीस लागली आहे माझ्या. तुमच्या या विटंबना चालल्यायत, प्रत्यक्ष पहातेय, तरीसुद्धां माझ्या मागं लागतेय ! घरीं चांगलं गडगंज आहे आणि हे दारिद्र्याचे डोहाळे कां आठवताहेत तिला ? ( दोघी हंसतात. सुंदर उठून त्यांच्यासमोर उभा राहतो ) तरी अजून हसतां आहां ? ते तुमचे नवरे तिकडे तळमळताहेत तुमच्यासाठीं, तरीसुद्धां हसतां आहां ?

**रजनी**:—तेंच पाहिलं तिनं.

**सुंदर**:—कुणी ?

**रजनी**:—तिनं—कल्याणीनं. कांहीं झालं तरी बायकोसाठीं नवरा तळमळतो हें पाहिलं तिनं, म्हणूनच ती लागलीय तुमच्यामागं.

**सुंदर**:—मी त्यांच्या जातीचा नाहीं. मी माणूस आहें. मी पुरुष नाहीं. ते पुरुषाच्या जातीचे आहेत, मी माणसाच्या जातीचा आहें. माणसाची जात अजून कुणाच्या ओळखीची झाली नाहीं. पुरुष काय, बायका काय, सारेच माणुसकीला पारखे झालेयत, म्हणून माणसाची ओळख पटत नाहीं कुणाला. माणुसकीची खूणगांठ पटली, कीं नवराबायकोचीं नातीं जोडतां यायचीं नाहींत. स्त्रीपुरुषांचे व्यवहार आहेत ते. तिथं माणुसकीचा संबंध नाहीं.—

**रमणी**:—हेंच वेड घोळतंय वाटतं अजून तुझ्या डोक्यांत ?

**सुंदर**:—( रजनीला उद्देशून ) हिनंच रुजवलं ना तें बीज ? आतां त्याचा भला मोठा वृक्ष झालाय. चोहीकडून वेढून टाकलंय मला त्याच्या पारंब्यानीं. कसा कातावून गेलोंय अगदीं. कधीं उकलणार हें गूढ ?

**रमणी**:—हें पहा दादा, आतां जरा माणसांत ये. आम्हा खुळ्या भोळ्या लोकांच्या भाषेंत माणूस शब्दाचा जो अर्थ आहे त्या अर्थानं माणसांत ये. दिवसेंदिवस हें प्रकरण भारीच वाहावत चाललंय. कुठंतरी बांध घातला पाहिजे याला.—

**सुंदर**:—मग जा कीं आपल्या नवऱ्याकडे. बोलावतोय ना तो ?

**रमणी**:—अन् ही ?—हिच्यासाठींच ना मी इथं राहिलें आजवर ? हिच्या अब्रूसाठीं—हिला कुणी नावं ठेवूं नयेत म्हणून ?—

**सुंदर**:—मग तिलाही नेऊन पोचीव आपल्या नवऱ्याकडे !

**रमणी**:—पण ती ऐकत नाहीं ना माझं.

**सुंदर**:—मग तूं जा—तिला भोगूं दे आपल्या कर्माचीं फळं.

**रजनी**:—आज कल्याणी कां आली होती कळलं ?

**सुंदर**:—कां आली होती ?—रोज येतेच आहे ती.—

**रजनी**:—रोजच्या सारखी ती आली नव्हती आज.—(स्तब्धता) तिच्या बापानं आज शेवटचं सांगितलंय तिला—( स्तब्धता ) तिही निघालीय आमच्या सारखीच घर टाकून.

**सुंदर**:—( मोठमोठ्यानें हंसत ) मोठी गंमत चाललीय. माणुसकी वाढूं लागलीय जिकडेतिकडे. तूं विष रुजवलंस हें, तेंच आतां बाधतंय प्रत्येकाला.—हें आमचं जिणं! माणसासारखं वागणं माणसाला कठीण होऊन बसलंय. सर्कशींतल्या वाघसिंहांसारखं कायद्याच्या फटक्याखालीं समाज नाचवतोय आम्हाला. कधीं मोडणार ही सर्कस ? कोण सांगणार या वाघासिंहांना, कीं तुम्ही मेंढरं नाहीं, वाघ सिंह आहांत, नरडं फोडून रक्त पिणारे वाघ सिंह आहांत ! केव्हां पटणार आहे हें यांना ?

**रजनी**:—जंगल गांठल्याशिवाय वाघाचा वाघपणा जागा होत नाहीं. मुर्दाड मांस खाणाऱ्या वाघाला आपल्या जातीचा विसर पडतो. म्हणूनच कुणीतरी या पिंजऱ्याचे दरवाजे तोडले पाहिजेत.

**सुंदर**:—कोण कधीं तोडणार हे दरवाजे ? प्रत्येकजण पडलाय पिंजऱ्यांत आपापल्या परीनं. कुणालाच आठवण नाहीं आपल्या माणुसकीची. असं वाटतं—( कल्याणी येते ) आलीस ? ये.—

**रमणी**:—ये, बैस. काय झालं पुढं ?

**कल्याणी**:—काय व्हायचं ? मला घराबाहेर घालवलं, त्या घरांत का पुन्हा जायचं ? तो अध्याय आतां संपला—

**सुंदर**:—घर सोडून पळालेल्या बायकांचं हें आतां असायुलम् ( Asylum ) होणार वाटतं ?

**रजनी**:—घर सोडून पळालेल्या नव्हे—घरांतून घालवून दिलेल्या.

**कल्याणी**:—इथं जागा नसेल मला, तर तसं सांगा. कुठं तरी जाऊन राहीन मी.

**सुंदर**:—कुठं जाणार आहेस ?

**कल्याणी**:—त्याच्याशीं तुम्हाला काय करायचंय ? मला इथं राहायचंय—मुद्दाम इथंच राहाचंय. तुम्ही नाहीं म्हटलंत तर मग पुढला विचार पाहायचा.

**सुंदर**:—या दोघींचे नवरे आज त्यांना बोलवायला आले होते—

**कल्याणी**:—तें मला माहीत आहे.—

**सुंदर**:—तेव्हां या जर पुन्हा आपल्या घरीं गेल्या—हं, हं, थांब—किंवा यांच्या नवऱ्यांनीं कायद्याच्या जोरावर यांना जर इथनं खेंचून नेलं, तरीसुद्धां तूं इथं राहाणार आहेस ?

**कल्याणी**:—तरीसुद्धां म्हणजे काय ?

**सुंदर**:—एवढं सुद्धां कळत नाहीं ? ही आहे म्हणून ही राहिलीय —बहीण आहे ना ही माझी ?—आतां या दोघीही जर गेल्या, तर माझ्यावर नजर ठेवायला मुकादम कोण आहे इथं ? मग कशी राहाणार तूं ?

**कल्याणी**:—माणसासारखी—समजलं ?—माणसासारखी ! स्त्री-सारखी नव्हे—

**सुंदर**:—ऐक रजनी, हें विष बरंच फैलावूं लागलंय्. ( रजनी हंसते ) हंसतेस काय ? तुम्हीं हंसाल पण रडावं लागेल मला.

**कल्याणी**:—भीतां रडायला ? हे पुरूष ! पुरूष म्हणजे धीराचा

माणूस असं लोक म्हणतात बरं रजनी ! खरं म्हणायचं म्हणजे पुरुष किती दुबळा असतो हें आम्हां बायकांना कळतं. पोरपणीं आई जगवते त्याला, दुखण्याबाह्याण्यांत आईबायकाच काळजी घेतात त्याची, अन् प्रेमाच्या पायीं देखील कुणातरी तरुणीच्या खांद्यावर मान टाकण्यासाठीं आतुर झालेला असतो हा धीराचा पुतळा !—यांच्या आधारावर आम्ही जगायचं !—या असल्या दुबळ्या जीवांच्या आधारावर आम्ही बायकांनीं जगायचं ? हुंः !—

**सुंदरः**—( उठून इकडे तिकडे फिरत ) एकूण तूंही इथं राहाणार अन् माझ्यासारख्या दुबळ्याची काळजी घेणार ?

**कल्याणीः**—हो.

**सुंदरः**—अन् तुम्ही दोघी केव्हां जाणार ?

**रजनीः**—दुबळा माणूस स्वतःची काळजी घ्यायला समर्थ झाला म्हणजे.

**कल्याणीः**—एकूण जन्मभर आम्हांला इथंच राहावं लागणार म्हणायचं !

**सुंदरः**—अगदीं बरोबर.—एकूण काय, आमचा हा संसार आतां असा थाटला गेला—होय ना ? यांत आतां बदल होणं नाहीं !

**रमणीः**—तें कुणी सांगावं ? तें काय तें आमचं आम्ही ठरवूं. इथं कुणाचं ऐकणार नाहीं आम्ही. काय ग ? असंच ना ? ( दोघीही होकार देतात ) पहा, झाली खात्री ?

( सुंदर एका कोंपऱ्यांतल्या खुर्चीवर जाऊन बसतो
आणि एक मोठा सुस्कारा सोडतो.)

**रमणीः**—चला ग, सुस्कारे टाकून कांहीं चूल पेटत नाहीं. चूल फुंकली पाहिजे आम्हालाच. कुठं गेला तो कृष्णा ?

**सुंदरः**—आतां कृष्णा तुमच्या हातून गेला. आतां तो फार मोठा माणूस झालाय. माझ्या पेक्षांही दुबळा झालाय. आतां तुम्हीच त्याची काळजी घेतली पाहिजे.

**रमणीः**—बरं, बरं. तुझी काळजी घेऊं, कृष्णाची काळजी घेऊं, आणखीन् कोण असेच दुबळे आले इथं, तर त्यांची सुद्धां काळजी घेऊं. चला ग.

( तिघीही आंत जातात. सुंदर एकेका चित्राकडे पहात स्टूडिओभर बावळ्या सारखा फिरत असतो. ऑथर येतो )

**ऑथरः**—वाः सुंदरराव, म्हटलं तुम्ही भेटतां कीं नाहीं ! एकूण तुमची तपश्चर्या फळाला आली म्हणायची. तें पारिसचं कसलंस मोठं बक्षिस मिळालं म्हणे तुम्हाला ? असं आहे हें. पिकतं तिथं विकत नाहीं. आमच्या वाङ्मयांत देखील असंच आहे. ते माधव-राव पटवर्धन—फार मोठा कवी आहे बरं,—त्यांचा तो निबंध इथल्या परीक्षकांनीं द्रुस्स ठरवला; पण त्याची कदर करणारा कुणी तरी पारिसचाच फ्रेंचमन् निघाला म्हणे. त्याच्या शिफारशीवर माधवराव मुंबई युनिव्हर्सिटीचे पहिले डी. लिट्. झाले. असं आहे हें.—कसली डिग्री मिळालीय तुम्हांला ?

**सुंदरः**—डिग्र्या नसतात पारिसमधें.

**ऑथरः**—काय म्हणतां काय ? पारिसमध्यें डिग्र्या नाहींत ? मग तिथले विद्वान कसे ओळखायचे ? लेबलाशिवाय माल ओळखायचा कसा गिऱ्हाईकानं ? छे छे, लेबल पाहिजे, डिग्री पाहिजे, चार दोन अक्षरं लावायला मिळालीं पाहिजेत नांवापुढं ! नुसता गौरव काय कामाचा ?—

**सुंदरः**—डिप्लोमा मिळतो ना !

**ऑथरः**—डिप्लोमा राहातो घरीं खुंटीवर लटकलेला. तो काय गळ्यांत घालून फिरतां येत नाहीं ! वर्तमानपत्रांत नांवापुढं काय लिहायचं ? छे छे, हे तुझे सारे उपद्व्याप फुकट गेले. इंग्लंडला तरी पाठवायचीं तीं चित्रं—

**सुंदरः**—तिथं झालीच कीं त्यांची शोभा !

**ऑथरः**—म्हणजे ? तसंच का इंग्लंडला ?

**सुंदरः**—आमचं हिंदुस्थान म्हणजे इंग्लंडची पडछाया आहे—इंग्लंडच्या मापांतून इथली विद्वत्ता मापली जाते. कलेच्या बाब-तींत ते आमच्याइतकेच निर्बुद्ध आहेत. अगदींच गतानुगतिक आहेत. नावीन्याचा तिटकारा असतो त्या लोकांना—म्हणूनच पारिस-इटलीकडे पहावं लागतं आम्हांला कलेसाठीं.

**ऑथरः**—असं आहे होय ? पण कांहीं म्हणा, डिग्रीशिवाय

आपलं समाधान होत नाहीं बुवा. नुसतं प्राईझ घेऊन काय करा-चंय ? फारतर रोमला जाल,-आणखी अभ्यास कराल, परत याल, पण तुमच्या विद्वत्तेची डिग्री किती वाढली आहे हें जगाला कळायला चारदोन अक्षरांची कुठली तरी डिग्री मिळायला हवीच ! तें कांहीं नाहीं, तुम्ही आधीं डिग्री मिळवा.

**सुंदरः**—मला डिग्री नको—प्राईझ नको–आणि रोमलाही जायला नको. शिकायचं म्हटलं तर इथंच पुष्कळ वाव आहे. तेवढयाला सुद्धां एवढं आयुष्य पुरायचं नाहीं—

**ऑथरः**—तें खरं आहे. तरीपण मी म्हणतों, झालं हें कांहीं थोडं नाहीं. आतां तुमचा गौरव केला पाहिजे आम्हांला. मी जुळवून आणतोंय तो सारा बेत—

**सुंदरः**—असं पहा, तूं असल्या भानगडींत पडूं नकोस. तुमच्या-साठीं कांहीं केलं नव्हतं मी. माझ्या समाधानासाठीं मी तीं चित्रं पाठविलीं होतीं पारिसला. मला तीं आवडत होतीं. इथल्या बड्या आर्टिस्टनां तीं पसंत नव्हतीं. विलायतेंतले आर्टिस्ट म्हणजे बडे आर्टिस्ट, असं इथल्या बड्या आर्टिस्टनांसुद्धां वाटत असतं, म्हणून मी पाठवलीं तीं चित्रं तिकडे. बडयांच्या बडयांनीं तीं उत्तम ठरवलीं. माझं समाधान झालं. यापेक्षां जास्त कांहीं नकोय मला.

**ऑथरः**—असं कसं होईल ? आमचं कर्तव्य आहे ना ? तें बजा-वायला पाहिजे ना आम्ही ? तसं कांहीं न केलं तर आम्ही आमच्या कर्तव्याला चुकलों असं नाहीं का जग म्हणायचं ? तें कांहीं नाहीं. हा समारंभ झालाच पाहिजे. तुझं कांहीं सुद्धां ऐकणार नाहीं आम्ही या बाबतींत. ( असें म्हणत निघून जातो )

**सुंदरः**—अरे थांब, थांब. जरा ऐक माझं. हंः—हें जग ! ( पुन्हा जाऊन एका खुर्चीवर आडवा पडतो. आंतून नटानें "धन्यवाद धन्यवाद !" असें म्हटलेलें ऐकूं येतें ) हा आला दुसरा गद्धा. ( नट येतो )

**नटः**—धन्यवाद ! धन्यवाद !—

**सुंदरः**—गप्प बैस—

**नटः**—भारताला भूषणभूत झालेल्या तरुणा, सारी भरतभूमि

तुझ्या वैभवाचे पोवाडे गात असतां मला गप् बसायला सांगतोस ?

**सुंदरः**—मूर्खाच्या तोंडची स्तुतीसुद्धां निंदेपेक्षां जास्त जाणवते.

**नटः**—मी मूर्ख ? मी मूर्ख अं ? कलावंतकुलशिरोमणे, कलाकाराच्या अभिमानानं उद्दीपित होऊन—

**सुंदरः**—कोण कलाकार ?

**नटः**—तूं.—कलाकार तूं ! मी.—कलाकार मी ! एक कलाकार दुसऱ्या कलाकाराचं वैभव पाहून उद्दीपित नाहीं का होणार ?—

**सुंदरः**—तूं कलाकार ?

**नटः**—मी कलाकार नाहीं ? मी कलाकार नाहीं तर कोण कलाकार ? पहा.—माझ्याकडे पहा—माझे अंगविक्षेप पहा. ऐक—माझी भाषा ऐक—माझ्या भाषेचं लालित्य ऐक. मी कलाकार नाहीं अं ?

**सुंदरः**—कृत्रिमतेचा मूर्तिमंत पुतळा तूं—

**नटः**—दुर्दैवी तरुणा, कलेला कृत्रिमता म्हणतोस ?

**सुंदरः**—हीच तुझी कला वाटतं ? या कलेमुळंच तूं कलाकार का ?

**नटः**—अर्थात्.

**सुंदरः**—अस्सं ? ( हंसतो ).

**नटः**—हंसूं नकोस. निसर्गावर विजय मिळवून वास्तवतेला कलापूर्ण करणाऱ्या या माझ्या कलेला हंसतोस ?

**सुंदरः**—( गंभीरपणें ) इकडे ये. इथं बैस. ( नट पवित्र्यांत बसतो ) असा कलापूर्ण बसूं नकोस. जरा माणसासारखा बैस.

**नटः**—माणसासारखा ? कलाकाराला माणसासारखा व्हायला सांगतोस ? मग रस्त्यांतला हमाल नि रंगभूमीवरचा कलावंत यांच्यांत फरक काय ? भिंती रंगवणारा रंगारी आणि तुझ्यासारखा कलावंत यांच्यांत फरक काय ? नाहीं—मी तसा बसणार नाहीं. मी माणसासारखा बसणार नाहीं. मी कलाकार आहें—मी माणूस नाहीं—

**सुंदरः**—हें मात्र अगदीं बरोबर बोललास. पण तुला माणसांत आणायचंय मला. या कृत्रिमतेंतून खेंचून तुला बाहेर काढायचंय.

**नटः**—( पुन्हां दुसरा पवित्रा घेऊन ) नाहीं—नाहीं—नाहीं. प्रति-

गामी तरुणा, मी पुरोगामी आहें. जीवनाच्या साकल्यांतून उत्पन्न होणाऱ्या संघर्षाच्या नव्या जाणिवेच्या अनुभूतींतून तूं खेंचून मागं ओढणार मला ?

**सुंदरः**—काय म्हणालास ?

**नटः**—हाय ! हें सुद्धां तुला न कळावं अं ?

**सुंदरः**—मी एक साधासीधा माणूस आहें. मला ही अशी कलात्मक भाषा कळत नाहीं. कुणाचं वाक्य बोललास हें ?

**नटः**—कुणाचं ? हरहर ! कलाकाराच्या अंतःकरणाच्या सखोल गर्तेंतून निर्माण होणाऱ्या भावनांच्या उत्तुंग लहरींच्या खळबळाटानं प्रसरण पावणारीं जीवनांचीं सूक्ष्म विचेष्टितं उद्भूत व्हायला कोणत्याही कलावंताला परक्याच्या बोजड भाषेची उसनवार भलावणी करावी लागत नाहीं.

**सुंदरः**—आतां हें साध्या माणसाच्या भाषेंत सांग पाहूं.

**नटः**—हुंः—( विचार करीत एक क्षणभर स्वस्थ राहातो )

**सुंदरः**—नाहीं सुचत ? पुन्हां एकदां ऐकीव पाहूं तें वाक्य मला. ( नट उभा राहून तेंच पूर्वीचं वाक्य अर्थानुरोधानें अभिनय करीत म्हणून दाखवतो ) ठीक. आतां ऐक. मी माणसाच्या भाषेंत सांगतों तुला. कलाकाराचं अंतःकरण भावनाशील असतं. सारं कांहीं त्याला सहज कळतं. जें कळतं तें पटण्यासाठीं तो परक्याचे बोल कशाला वापरील ?

**नटः**—पुन्हां सांग.

**सुंदरः**—ऐक. ( तें वाक्य पुन्हां बोलून दाखवतो )

**नटः**—छान ! अर्थ तोच—पण तो शब्दांचा झंकार नाहीं—भाषासौष्ठव नाहीं—भाषेचं वैभव तर नाहींच नाहीं. भाषेच्या साधेपणाची कमाल मर्यादा गांठलेली असली तरी कलेचा मागमूस सुद्धां नाहीं.

**सुंदरः**— तासे वाजंत्री ढोल नगाऱ्यांचा दणदणाट नाहीं. नुसतं बांसरीचं सुरेल गोड गाणं !

**नटः**—हं ! पण त्या नगाऱ्याच्या दणदणटांत जें वैभव आहे—जो कलेचा परमोच्चांक साधलेला आहे—तो बांसरींत नाहीं. बांसरी गोड असेल, मंजुळ असेल,—बांसरीच्या नादानं वेडा चक्षुःश्रवा

घटकाभर डुलेल—पण दणदणाट—कलेचा दणदणाट—वास्तव-तेवर विजय मिळवणारा कलेचा खणखणाट—तो निनाद—तो झंकार—त्या तुझ्या साध्यासिध्या बांसरींत नाहीं.

**सुंदरः**—असं होय ? आपण पाहूं या तेंच !—

**नटः**—पण थांब. तुझे धन्यवाद मानण्यासाठीं मीं आलोंय—

**सुंदरः**—सध्यां राहूं दे. आधीं आपण थोडी कलेची चर्चा करूं. ( कल्याणी येते ) ये कला, सध्यां आमची कलेची चर्चा चाललीय बरं का !—हिला मोठा अभिमान आहे कलेचा. पुन्हा सांगतां येईल का तुला तें वाक्य ?

**नटः**—पुन्हा ? ( ओरडून ) माझा अपमान करतोस ?—हंः ? माझा अपमान करतोस ? मी नट आहें. एकच वाक्य हजारवेळां हजारों रात्रीं, हजारों लोकांसमोर पुन्हा पुन्हा उच्चारलं तर ज्याचा शब्द चुकणार नाहीं, ज्याचे उच्चार, ज्याचे विक्षेप आणि प्रक्षेप एवढेही ढळणार नाहींत, त्याला विचारतोस कीं पुन्हां म्हणतां येईल काय म्हणून ? धिक्कार ! धिक्कार !! धिक्कार असो तुला !!!
( रजनी आणि रमणी प्रवेश करतात. एकीच्या हातांत अर्धी चिरलेली भाजीची पेंडी आणि दुसरीच्या हातांत तांदळाची भिजलेली रोवळी आहे )

**रमणीः** }
**रजनीः** } —काय झालं ?

**रजनीः**—आगबीग लागली कीं काय ? काय झालं ?

**सुंदरः**—धन्यवाद द्यायला आला अन् बिचारा धिक्कार करूं लागला !

**नटः**—कसा न धिक्कारील ? माझ्या कलेचा उपमर्द !

**सुंदरः**—मी तुझा उपमर्द करीत नाहीं आणि तुझ्या कलेचाही नाहीं. तूं नट आहेस—होय ना ? ज्या प्रकारची भूमिका लेखकानं योजली असेल, तशी ती करून दाखवायची असते तुला. समज, कुणा मूर्ख लेखकानं एक माझ्यासारखं पात्र घडवलं आणि ती भूमिका करायचं दुर्दैवानं तुझ्या नशिबीं आलं—

**नटः**—असं होतं—वारंवार होतं—पदोपदीं होतं. पण आम्ही सावरून घेतों. आम्ही ऐकत नाहीं त्या लेखकाचं—स्वयंस्फूर्त भावनेनं अंतःकरणांतून जो उद्रेक निघेल—

**सुंदरः**—थांब, थांब, थांब. जरा माणसांत ये. पण आधीं तुझं वैभव जरा यांना दाखवूं दे मला. बरं का रजनी, अन् तूं ग, मी सहज चुकून म्हटलं,—कांहीतरी मोठं अगडबंब असं हा बोलला—मी म्हटलं, 'कुणाचं वाक्य हें?' तेव्हां याला राग आला आणि हा म्हणाला—काय म्हणालास रे?

( नट तें पूर्वीचें वाक्य एका दमांत म्हणून दाखवतो. )

**सुंदरः**—कळलं तुम्हांला? नाहीं? बरं आतां असं कर, तुझी दमछक्की मला माहीत आहे. आतां जरा थंडपणें सांग. ( नट ठाय लयींत बोलतो आणि वाक्याच्या शेवटीं दमछाट होऊन मट्कन् खुर्चीवर बसतो. )

**सुंदरः**—( नटाला ) कळलं? ( नट एक मोठा सुस्कारा सोडतो ) आणि तुम्हाला ग?—कळलं का कांहीं?

**कल्याणीः**—शब्द कळले—अर्थ कळला नाहीं.

**रजनीः**—शब्द ऐकूं आले—एवढंच!

**रमणीः**—मला कांहीं सुद्धां कळलं नाहीं.

**सुंदरः**—आतां मी सांगतों. या साऱ्या अगडबंब वाक्याचा एवढाच सारांश—( नटाला ) आतां मी सांगतों तसं म्हण पाहूं. ( सुंदर पूर्वीचें आपलें वाक्य बोलून दाखवतो )

**नटः**—ही कला नव्हे. हा खोकला आहे.

**सुंदरः**—ती कोटी राहूं दे सध्यां. मी सांगितलं ना तुला, कीं अशी एक भूमिका घडवलीय्. अशी—माझ्यासारखी—असं समजून दाखव पाहूं बोलून. ( सुंदर वाक्याची संथा देतो. नट म्हणतो. नंतर स्वतंत्र रीतीनें वाक्य उच्चारतो. )

**नटः**—छे! हें जमत नाहीं. अंगविक्षेपाला जागा नाहीं. पवित्रे घेतां येत नाहींत. अगदींच घरगुती बोलणं वाटतं हें. छेः! नव्हेच तें!

**सुंदरः**—फार कठीण जातंय. नाहीं? माणुसकी इतकीच कठीण असते. कला म्हणजे माणुसकी आहे, निसर्गाचं नागवं स्वरूप आहे, म्हणूनच ती कला आहे. कला म्हणजे दागिन्यानं मढवलेली जगदंबा नव्हे.

**नट**:—पण अभिनय—अभिनयाचं काय ?

**सुंदर**:—अभिनय म्हणजे काय ? अभिनय म्हणजे जसं आहे तसं दाखवणं. जसं नाहीं तसं दाखवणं नव्हे. निसर्गाचं स्वाभाविक स्वरूप—गांवठी न्हाव्याच्या आरशांतली विकृती नव्हे !

**नट**:—इथंच तुझं आमचं पटत नाहीं.

**सुंदर**:—आतां कसं माणसासारखं बोललास !

**नट**:—माणसासारखं अं ? मी माणूस नाहीं.—

**कल्याणी**:—खरं आहे तें. माणसाचं लक्षण कांहींच दिसत नव्हतं तुमच्यांत !

**रजनी**:—तुमचं लग्न झालंय का हो ?—माफ करा हं विचारलं म्हणून.

**सुंदर**:—हिचं लग्न झालंय. कांहीं भीति नाहीं हिच्यापासून तुला.

**नट**:—लग्नच कां ? चार मुलं आहेत मला.

**रजनी**:—तुमचीं मुलं घाबरत नाहींत तुम्हांला ?

**नट**:—कां घाबरतील ? बाप आहें मी त्यांचा. मोठीं हुषार आहेत माझीं मुलं.

**रजनी**:—आणि तुमची बायको ?

**नट**:—तीही मोठी प्रेमळ आहे. मोठा अभिमान आहे तिला माझा.

**रजनी**:—असेच कां बोलतां तिच्याशीं ?

**नट**:—( गांगरून ) असेच ? असेच म्हणजे कसे ?

**रजनी**:—म्हणजे आतां बोलताहांत असे ?

**नट**:—( गांगरून ) हो !

**रजनी**:—अन् तें मघांचं बोलणं ?—कलावंताचं बोलणं ?—तसं कां नाहीं बोलत तुम्ही तिच्याबरोबर ?

**नट**:—घर आहे ना तें ? ती काय रंगभूमि नव्हे !

**सुंदर**:—ऐक रजनी, ऐक कल्याणी, घर म्हणजे रंगभूमि नव्हे—अन् रंगभूमि म्हणजेही घर नव्हे. ( नटाला ) असंच ना ?

**नट**:—हो—काय म्हटलंस ?

**सुंदर**:—कला आणि वास्तवता यांतला फरक पाहात होतों मीं.

कला म्हणजे रंगभूमि आणि वास्तवता म्हणजे घर, असंच ना तुझं म्हणणं ?

**नटः**—हो.

**सुंदरः**—म्हणजे जें घरांत दिसतं तें रंगभूमीवर दिसायचं नाहीं—रंगभूमि म्हणजे घराचं वेडावणं का ?

**नटः**—अप्रबुद्ध कलावंता—

**सुंदरः**—थांब—घरांत ये. ही रंगभूमी नव्हे. घरांतल्या माणसासारखा बोल. घरांत बायकोशीं बोलतोस तसा बोल. मुलांशीं बोलतोस तसा बोल. बायकामुलांच्या गोष्टी निघाल्याबरोबर आतां जसा बोलत होतास तसा बोल. ( नट एक सुस्कारा सोडून खालीं बसतो. ) पाहिलंस रजनी, हें असं चाललंय. दांभिकपणाला मोल आहे. स्वाभाविक जीवन कुणाला पटत नाहीं. हेंच चाललंय आमच्या चित्रकलेंत. माणुसकी नाहींशी होतेय आमच्या कलेंतून. ( कृष्णा फ्रेम घेऊन प्रवेश करतो ) हा आला एक कलावंत. कुठं गेला होतास रे कृष्णा ?

**कृष्णाः**—येडं हाय ह्यें जग. गोप्याला दावलं—गन्याला दावलं—धोंड्याला दावलं—कुनालाबी उमगना. म्हंगाया लागल, 'तसबीर तरी असंती देवाची !'—पण हतं हाय काय ? नुसतीं छापील अक्षरं—अन् तीं बी विंग्रजी. वाचताबी येईनात. धोंड्या वाचतो बालबोध. तो म्हंगाला, 'बालबोध करून आन ह्याचं.' साटपासट रुपये फुकट गेले तुमचे मालक !

**सुंदरः**—नाहींरे बाबा. हे रुपये वसूल करायला गेलास तूं रामा गड्याकडे. मारुतीला माणकं दाखवायला गेलास. त्यांना काय होय हा कागद ? माणकाची किंमत जवाहिऱ्याला असते—ते येऊंदेत ना रत्नपारखी—

**नटः**—काय आहे तें ?

**कृष्णाः**—ह्यांना दावूं का ?

**सुंदरः**—त्यालासुद्धां नाहीं कळायचं.

**कृष्णाः**—( नटाला ) विंग्रजी येतं का तुम्हास्नी ?

**नटः**—काय म्हणालास ? तुला माहीत नाहीं ? मी लोकप्रिय नट

आहे—नटसम्राट आहे. इंग्रजी आल्याशिवाय मी नटसम्राट कसा होईन ?

**सुंदरः**—पुन्हा उठूं लागलास माणसांतून.

**नटः**—पाहूं—( कृष्णाच्या हातांतली फ्रेम घेतो आणि वाचतो ) कृष्णा डेमा रामगडा, फेलो ऑफ दि रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्स् !—म्हणजे ? हा कृष्णा एफ. आर. एस्. ए.

**कृष्णाः**—किष्णा डेमा रामगडा ए फा रे शे. वा रे मी ! तीन गिन्या टिचल्यायत राव—मी नव्हे—या मालकांनीं. चाकरीच केलीया मी तशी—

**रमणीः**—खरं आहे तें. जन्मभर मालकी गाजवीत आला धन्यावर—त्याचे उपकार नको फेडायला धन्यानं ?

**नटः**—हा गडी एफ. आर. एस. ए. अं ?

**कल्याणीः**—त्याला कां मिळूं नये ही डिग्री ? तीन गिनींची बाब आहे. कुणालाही होतां येईल एफ. आर. एस. ए.—तुम्हीही व्हा कीं एफ. आर. एस. ए.

**सुंदरः**—या असल्या विकत्या पदव्यांवर तुम्ही कलावंतांची योग्यता ठरवणार ? कलेच्या प्रत्यक्ष प्रमाणाला कुठं किंमतच का नाहीं ? ( ऑथर प्रवेश करतो )

**ऑथरः**—( नटाला ) इथं बसला होतास का ? सारा गांव पालथा घातला तुझ्यासाठीं पण तुला कुठं आहे आपल्या कलेची किंमत ? चल ऊठ. शिष्टमंडळांत तूं नसलास तर साऱ्या कलावंतांची भरपाई कशी व्हायची ?

**नटः**—कसलं शिष्टमंडळ ?

**ऑथरः**—तें कळेल आपोआप. चल ऊठ. ( ते दोघे जाऊं लागतात तोंच कृष्णा त्यांना आड येतो )

**कृष्णाः**—( ऑथरला फ्रेम दाखवीत ) ह्ये बघा की अदुगर.

**ऑथरः**—मला वेळ नाहीं एव्हां.

**सुंदरः**—अरे पहा तर खरं.

**ऑथरः**—पाहीन—पाहीन—पाहायच्या वेळीं पाहीन. ( ऑथर, नट व कृष्णा जातात )

**सुंदर**:—पाहिलंत ? एवढी मोठी डिग्री मिळवली या कृष्णानं पण त्याची कदर नाहीं यांना ! अन् ही कसली धांदल चालली आहे कळलं ? माझा गौरव करणार आहेत !—इथं गचाळ ठरवलेलीं माझीं चित्रं पारिसच्या प्रदर्शनांत दाखवलीं गेलीं त्याबद्दल माझा गौरव करणार आहेत ! असं आहे हें विलायती शिक्क्याचं महात्म्य ! ( बाबूराव येतो )

**बाबुराव**:—तूं आहेस ना इथं सुंदरराव ? मघा येऊन गेलों त्यावेळीं या कुणीच नव्हत्या इथं. आतां सारींच आहांत तुम्ही इथं. आतां तूंच सांग, किती दिवस हें असं चालणार आहे ?

**सुंदर**:—तिलाच विचार ना.

**बाबुराव**:—( रजनीला ) मी विचारतोंय म्हटलं !

**रजनी**:—मी ऐकतेंय.

**बाबुराव**:—मग ?

**रजनी**:—घरांतून घालवून दिलंय मला.

**बाबुराव**:—तें खरं—पण आतां मीच बोलावतोंय.

**कल्याणी**:—आधीं घालवून दिलं कां आणि आतां बोलावतां कां, तें कळायला नको का आम्हाला ?

**बाबुराव**:—मीं तिला सांगतोंय !

**कल्याणी**:—आतां एकटी नाहीं ती इथं. आम्ही तिघीही एक आहोंत आतां. होय ना ग ?

**बाबुराव**:—तिघी एक म्हटल्यानं कांहीं एक होत नाहीं. माझं लग्न झालंय तें एकीशींच—( सर्व हंसतात ) हंसूं नका. माझ्या बायकोचं उत्तर पाहिजेय मला.

**रजनी**:—आधीं कां घालवून दिलंत मला ?

**बाबुराव**:—अवज्ञा केलीस माझी त्या दिवशीं—येत नाहीं म्हणालीस—

**रजनी**:—आतांही तेंच म्हणतें !

**बाबुराव**:—पण आतां नाहीं मी तसं म्हणत !—तुला यायचंय कीं नाहीं ? ( रजनी बोलत नाहीं ) मी पुन्हा विचारतोंय, तुला यायचंय कीं नाहीं ?

**कल्याणी**:—मी सांगतें, ती यायची नाहीं.

**बाबुराव**:—मला तिचं उत्तर पाहिजे.

**कल्याणी**:—मी सांगितलं तेंच तिचं उत्तर.

**बाबुराव**:—( सुंदरला ) तुझं काय म्हणणं आहे ?

**सुंदर**:—माझा काय संबंध आहे यांत ?

**बाबुराव**:—तुझ्याकडे येऊन राहिली आहे ही.

**सुंदर**:—तशी ही राहिलीय—हीही राहिलीय. जिव्हाळ्याचीं माणसं माझ्या घरीं येऊन राहिलीं तर त्यांना नको म्हणण्याइतका मी गृहस्थपणा सोडला नाहीं.

**बाबुराव**:—असं का ? ठीक आहे. आतां कायदा काय म्हणतो तें पाहायचंय मला. ( जातो )

**सुंदर**:—( एक क्षणानंतर ) गांजून सोडलंय या कायद्यानं अन् रूढीनं ! रजनी, तूं जा कशी इथून—अन् तूंही जा ग रमणी.

**कल्याणी**:—( एक क्षणानें ) अन् मला नाहीं कुठं जायला सांगितलंत तें ?

**सुंदर**:—तुला कायदा आड येत नाहीं.

**रमणी**:—कायद्याला भ्यायलास ? मीं बहीण ना तुझी ? माहेरवासालासुद्धां येऊं नये मी ?

**सुंदर**:—पण किती दिवस ?

**रमणी**:—तें मी ठरवायचंय.

**सुंदर**:—अन् ही ?

**रजनी**:—मी शिष्या आहें तुमची.

**सुंदर**:—अस्सं ! एक बहीण—एक शिष्या—आणि ही तिसरी ? ही कोण ?

**कल्याणी**:—श्रीमंत आईबापांनीं घरांतून घालवून दिलेली एक निराधार भिकारीण.

**सुंदर**—पारिसच्या प्रदर्शनांत माझीं चित्रं ठेवलीं म्हणून मी श्रीमंत झालों असं का वाटतं तुम्हांला ?

**रजनी**:—असं कुठं म्हटलं कुणी ? अनाथाला आश्रय हवा तो काय श्रीमंतांचाच ?

**सुंदरः**—मग कुणाचा ?

**रजनीः**—कुणाचाही ! गरीबाचा कळवळा गरीबांनाच असतो.

**सुंदरः**—असं होय ? ( स्तब्धता )

**रमणीः**—विचार कसला करतोयस दादा ?

**सुंदरः**—कोणत्या प्रमाणांत किती अविचार करायचा, याचा विचार करतोंय मी.

**रमणीः**—मग ?

**सुंदरः**—कांहीं निश्चित ठरत नाहीं. विचार करून पाहातोंय. मला वाटतं जगाच्या अंतापर्यंत हाच विचार करीत बसावं लागणार मला.

**कल्याणीः**—अविचार करायला विचार करावा लागत नाहीं !

**सुंदरः**—चुकतेस कला. विचारपूर्वक अविचार करायचा असतो तेव्हां त्याचा फार विचार करावा लागतो. यशाची आशा असली म्हणजे अविचारानं अविचार करतां कामा नये. अविचार हा पौरुषाचा पुरावा आहे—पौरुषाचं प्रमाण आहे; फाजील विचार करणं, हें बायकी लक्षण आहे; या दोहोंची तोंडमिळवणी करून माणुसकी कशी निर्माण होते ती पाहातों आहें.

**रजनीः**—माणुसकी का ? या माणुसकीनें फार पकड धरलीय तुमची. बरं नव्हे हें लक्षण.

**सुंदरः**—खरं आहे तें. तो माणुस आहे माझ्या नजरेसमोर. शिंगं, शेपटी, दाढी मिशा आणि स्तन असलेला तो माणूस—कीं तें माणूस—तो, ती, तें—या साऱ्या सर्वनामांपलीकडचा माणूस—त्यानं भंडावून सोडलंय मला ! त्याच्या दृष्टीनंच अविचार करणार आहें. ( बळवंतराव येतो. )

**बळवंतः**—बाबूराव आहेत का इथं ?—नाहींत ?—

**सुंदरः**—पाहा ना.

**बळवंतः**—इथंच जातों म्हणाले मला—अन् ही तर अजून इथंच आहे !—

**कल्याणीः**—येऊन गेले ते.

**बळवंतः**—हिला घेतल्याशिवाय ?

**कल्याणीः**—हो.

**बळवंतः**—मी जाणार नाहीं तसा.

**सुंदरः**—छान् ! एक दगड कमी होईल माझ्या गळ्यांतला.

**बळवंतः**—( रमणीला ) काय ?—मी काय म्हणतोंय ?

**कल्याणीः**—कुणाला ?

**बळवंतः**—हिला—माझ्या धर्मपत्नीला.

**रमणीः**—काय ? काय आहे ?

**बळवंतः**—आतां घरीं चलायचं म्हटलं !

**रमणीः**—मी माहेरीं आलेंय.

**बळवंतः**—केव्हां संपणार हा माहेरवास ?

**रमणीः**—मी परत येईन तेव्हां—

**बळवंतः**—केव्हां येणार परत ?

**रमणीः**—माहेरपण संपतांच.—मोठा कठीण ओढा असतो हा माहेरवासाचा.

**बळवंतः**—कां हो बंधुराज, तुमचं काय म्हणणं आहे ?

**सुंदरः**—माझा काय संबंध आहे यांत ?

**बळवंतः**—किती दिवस ठेवून घेणार हिला ?

**सुंदरः**—ती जाईपर्यंत.

**बळवंतः**—केव्हां जाणार ती इथून ?

**सुंदरः**—तिलाच विचारा ना ?

**बळवंतः**—मोठीं खट्याळ माणसं दिसतां तुम्ही ! एक सुद्धां कुणी सरळ उत्तर देत नाहीं !

**कल्याणीः**—जा ना आतां घरीं.

**बळवंतः**—मी काय सांगितलं आलों तेव्हां ? हिला घेतल्याशिवाय मी जाणार नाहीं इथून.

**सुंदरः**—माझ्या गळ्यांत चौथा धोंडा !—आतां तो बाबूराव देखील राहणार वाटतं इथं येऊन !

**रजनीः**—हे असतील तिथ आम्ही नाहीं राहणार.

**सुंदरः**—मग असं कर बळवंतराव, त्यां बाबूरावाला इथंच घेऊन ये. इथंच राहा तुम्ही दोघे—म्हणजे आपोआप या ब्यादी जातील इथून.

**बळवंतः**—तसं जायला नको कुणी. ही राहिली पाहिजे माझ्याकडे.

**कल्याणीः**—किंवा तुम्ही हिच्याकडे !—म्हणजे दोन्ही एकाजागीं !

**रमणीः**—
**रजनीः**— } तें आतां होणं नाहीं.

**सुंदरः**—मोठा कठीण प्रसंग आलाय हा !

**बळवंतः**—प्रसंग कठीण तर खराच—मग मी काय करूं आतां ?

**सुंदरः**—तें तुमचं तुम्ही पाहून घ्या. मला काळजी पडलीय माझ्या जेवणाची. ही भाजी इथंच पडली आहे, तांदुळ इथंच आहेत, यां काय कुणी ऐकत नाहींत, कृष्णाही कुठं तोंड घेऊन निघून गेला, मी चाललों आतां चुलीच्या उपासनेला. ( भाजी आणि तांदळाची रोवळी घेऊन आंत जातो. रजनी, रमणी आणि कल्याणी कोंपऱ्यांत खुर्च्या फिरवून वर्तुळ करून बसतात )

**बळवंतः**—( मोठ्यानें ओरडून ) काय ? येणार कीं नाहीं ?

**कल्याणीः**—( बसल्या जागेवरून आणखी मोठयानें ओरडून ) आम्ही कुणीच इथं नाहीं. आम्ही इथून निघून गेलों आहोंत.

**बळवंतः**—आतां काय म्हणावं यांना ! ( विश्वासराव येतो ) बरं झालं तुम्ही आलांत ते.

**विश्वासः**—आहेस ना इथं ? बरं झालं. किती शोधून दमलों मी. हें आधीं कळायला पाहिजे होतं मला कीं दावणीवर गाय असली कीं बैल तिथं जायचाच !—( ऑथर, कवि, बाबुराव, आणि इतर कांहीं गृहस्थ हातांत एक हाराची टोपली घेऊन येतात. नट रिकाम्या हातानें येतो. कृष्णा सर्वांच्या मागून फ्रेम घेऊन येतो आणि सर्वांच्या मधून घुसून पुढें येतो )

**कृष्णाः**—( त्यांना अडवीत ) हं. हतच उभे ऱ्हावा. म्होरं न्हाई जायचं. माझा हुकूम हाय.

**विश्वास**—बरं ! बरं ! तुझे मालक कुठं आहेत ?

**कृष्णाः**—( इकडे तिकडे पाहून ) अरे इच्याभनं ! हतच व्हते कीं ! कुट ग्येले ? कुनींच नाई दिसत हत अन् त्या आवा कुट ग्येल्याती ?

[ हातांत तांदळाची रोवळी घेऊन सुंदर आंतून बाहेर येतो. त्यानें

अस्तन्या गुंडाळल्या आहेत. धोतर वर खोंचलें आहे. आंत तो रोंवळीतले तांदूळ धूत असावा. ]

**सुंदरः**—काय आहे गडबड ?

( विश्वासराव एकाच्या हातांतील टोपली घेऊन त्यांतील हार घेऊन सुंदरसमोर येतो )

**विश्वासः**—यच्चयावत् कलावंतांचं हें शिष्टमंडळ तुमच्या गौरवा-साठीं आज इथं आलं आहे. त्यांच्या वतीनं हा हार—

**ऑथरः**—थांबा—( विश्वासरावाला मागें लोटून हार घेऊन आपण होऊन ) पारीसच्या प्रदर्शनांत आपल्या चित्रांना स्थान मिळून आपल्या कलेची जी प्रतिष्ठा पारीसनं केली, आणि त्यामुळें परदेशांत या भारतवर्षाचं नांव उज्वल करण्यास आपण जे समर्थ झालां, त्याबद्दल अखिलभारतीय साहित्यसमितीच्या विद्यमानें मी हा हार—

**सुंदरः**—थांब. माझ्यापेक्षांही ज्यास्त मानाला पात्र झालेली एक महान व्यक्ति इथं हजर असतां—( ‘ कोण ’, ‘ कोण ’, म्हणून सारे ओरडतात ) एफ्. आर. एस्. ए. या पदवीनं ज्याला विभूषित केलं आहे तो हा—

**कृष्णाः**—मी—कृष्णा डेमा रामगडा, ए–फा–रे–से—

**विश्वासः**—कोण ?

**सुंदर**—हा—( कृष्णा फ्रेम दाखवतो. नटाखेरीज सर्व एकाच्या हातून एक घेऊन ती फ्रेम पाहातात. )

**विश्वासः**—हा कृष्णा एफ्. आर. एस. ए ?

**सुंदरः**—कां नसावा ? नुसती तीन गिनीची बाब आहे.

**बळवंतः**—तीन गिनीची बाब ? म्हणजे ही डिग्री नव्हे ?

**सुंदरः**—पाहा ना तुम्हीच. हं, विश्वासराव, आतां घाला ते हार या कृष्णाच्या गळ्यांत. ( कुणा एकाच्या हातांतला हार घेऊन कृष्णाच्या गळ्यांत घालतो. त्यासरशीं एकेक जण करंडीतील हार कृष्णाला घालूं लागतात. )

**विश्वासः**—अरे काय चालवलंय हें तुम्ही ?—सुंदररावाच्या गौरवासाठीं ना आलों होतों आम्ही ? सुंदरराव, आमच्या अखिल-भारतीय कलामंडळाच्या वतीनें हा हार मी—

**सुंदर**:—थांबा. कशासाठीं हा माझा गौरव ?
**विश्वास**:—पारिसच्या प्रदर्शनांत तुमचीं चित्रं—
**सुंदर**:—आणि इथल्या प्रदर्शनांत ?—
**विश्वास**:—तें जाऊं द्या हो !—
**सुंदर**:—तींच माझीं चित्रं फेंकून दिलीं होतीं. तुम्ही माझी हेटाळणी केली. उपदेश केला तुम्ही मला, कीं चांगली चित्रांसारखी चित्रं काढ म्हणून—तेच ना तुम्ही ?
**विश्वास**:—पण आतां पारिसच्या प्रदर्शनांत—
**सुंदर**:—पारिसच्या प्रदर्शनांत काय वाटेल तें झालं. पण इथं ? या माझ्या मायभूमींतल्या कलावंतांनीं कोणती किंमत दिली माझ्या चित्रांना ? फेंकून दिलीं ! माझ्या मायभूमींतल्या प्रदर्शनांत दाखवायला नालायख ठरवलीं—आणि आतां साता समुद्रापलीकडच्या लोकांनीं माझी तारीफ केली, त्या वेळीं तुम्ही हार घेऊन धांवलांत ?
**आथर**:—( नटाला ) अरे तूं बोल ना. असं जोरांत भाषण कर.
**नट**:—( पुढें होऊन स्वाभाविक भाषेंत ) पाहिलंत सुंदरराव, मी हार घेऊन आलों नाहीं.—
**ऑथर**:—असं काय झालं याला ?
**नट**:—मी हार घेऊन आलों नाहीं. कां ? मींही एक कलावंत आहें. माझ्या कलेचीं अशीच उपेक्षा होतेय. माझ्या कलेला कला म्हणायला देखील कुणी तयार नाहीं. कुणा तरी परकी नटांच्या अनुकरणानं आम्ही अभिनयाला कृत्रिमता आणली. तो बनावटपणा आम्हाला जाणवत होता—पण त्या बनावटपणाचंच जग कौतुक करूं लागलं तेव्हां त्या बनावटपणालाच आम्ही कला म्हणूं लागलों. पोट जाळायचं होतं ना आम्हांला ? बायकामुलांच्या कबिल्याला अन्न घालायचं होतं—तसंच कीर्तीच्या अन्नावर जगांत वावरायचं होतं. या संसारानं आमचा घात घेतला. पोट जाळण्यासाठीं आम्ही बनावटपणाचा पसारा थाटला—
**ऑथर**—बस् बस्. पुरे कर. कुणी शिकवला तुला हा गाढवपणा ?
**नट**:—( सुंदररावाकडे बोट दाखवून ) यांनीं.
**कवी**:—ढेंकणाच्या संगें हिरा जो भंगला !

**ऑथर**—सुंदरराव, अंतःकरणपूर्वक मला तुमचा अभिमान वाटतोय—

**सुंदरः**—बनावटांचा बाजार सारा ! दुसऱ्याच्या बुद्धीनं जगणारे निर्बुद्धांचे पुतुळे तुम्ही—तुमचा हा गौरव म्हणजे देखील अपमान आहे माझा ! चालते व्हा इथनं सारेजण. तेव्हांचे तुमचे ते जोडे आणि आतांचे तुमचे हे हार, दोन्हीही सारखे आहेत मला ! मला तुमची स्तुतीही नको आणि तुमची निंदाही नको. समजलं ? चालते व्हा इथनं—निघा म्हणतों ना !—( एकेकाला धक्की मारून बाहेर घालवतो )

**नटः**—( बाजूला राहिलेला ) माफ करा. मला सक्तीनं आणलं यांनीं आपल्याबरोबर !—

**सुंदरः**—( त्याची पाठ थोपटून ) जा, बाबा, जा. जाग आलीय त्याचं कांहीं सार्थक कर. ( नट नमस्कार करून जातो ) ( कृष्णाला ) अन् तूंही जारे हीं सगळीं हाराचीं ओझीं घेऊन. एका गाढवाचं ओझं आहे हें ! दे फेंकून गटारांत—नाहींतर असं कर, शेजाऱ्या माळ्याला अर्ध्या किंमतीनं नेऊन वीक हे हार—आठवड्याचा चहा भागेल यांत तुझा ! ( कृष्णा हार घेऊन जातो ) कुठं गेल्या या पोरी ? ( तिघीही उठून समोर येतात. सुंदर मोठ्यानें हंसतो. ) एवढी गडबड चालत असतांना इतका वेळ बायकांची जात गुपचिप बसूं शकते अं ?

**रमणीः**—पहा ना आतां तूंच.

**सुंदरः**—नवऱ्यांना भ्यायलांत ? आतां गेले ते—(बळवंतराव बाबूराव प्रवेश करतात )

**बळवंतः**— } नाही. यांना घेतल्याशिवाय आम्ही आतां जाणार
**बाबुरावः**— } नाहीं.

( दोघेही जमिनीवर बैठक मारतात )

**सुंदरः**—हें पहा रजनी, इथं तुझी चूक झाली. तुला आर्टिस्ट व्हायचं होतं तर तूं स्वतंत्र राहायला हवं होतं. संसाराचा बोजा माथीं घेऊन कलेची उपासना होत नाहीं. ही कला सोडून दे आतां. लग्न करून चुकली आहेस—कायद्यानं बांधली गेली आहेस—

आतां तुला दुसरा मार्ग नाहीं. बाबूराव, इकडे या. ही घ्या आपली बायको आणि जा पाहूं इथून दोघेंही. जा म्हणतों ना ! नाहींतर धक्की मारून बाहेर काढीन दोघांनांही—

( रजनीचा हात धरून बाबूराव तिला ओढीत नेतो )

**रमणीः**—( रागानें चिडून सुंदरकडे पहात ) आतां माझ्यावर नको संक्रांत वळायला ! भाऊ म्हणे भाऊ ! कळली ही रक्ताची माया. जो तो स्वार्थ पाहातो आपला—अन् मी कांहीं आर्टिस्टही नाहीं. ( बळवंतरावाला ) ऐकलं का ? उठायचं म्हटलं. घरीं जायचंय ना ?

[ बळवंतराव उठूज तिच्याकडे पाहून हंसतो. रमणी त्याच्याकडे पाहून हंसते. दोघें हातांत हात घालतात आणि जातांना सुंदरला वेडावणें दाखवून निघून जातात. सुंदर मोठमोठ्यानें हंसू लागतो. हंशाच्या उकळ्या त्याला अनावर होतात. ]

**कल्याणीः**—हंसायला काय झालं एवढं ? हीच का ती माणुसकी ? केवढा माणुसकीचा बडिवार सांगत होतां ?—माणुसकी म्हणजे निर्दयपणा का ? दयामायासुद्धां नाहीं का तुमच्या या माणुसकींत ?

**सुंदरः**—कां ? काय झालं ?

**कल्याणीः**—त्यांना घालवून दिलंत ?

**सुंदरः**—सर्वांनाच घालवून दिले मी.

**कल्याणीः**—त्यांना नव्हे—रजनी आणि रमणीला.

**सुंदरः**—पण त्या गेल्या ना आतांच !

**कल्याणीः**—तुम्ही घालवलं त्यांना—सक्तीनं घालवून दिलं—

**सुंदरः**—पण त्या गेल्या ! बसल्या नाहींत बैठक मारून बाबूराव-बळवंतरावासारख्या. ( क्षणभर स्तब्धता ) मोठा बिकट आहे हा लग्नाचा फांस ! साऱ्या कलेची गळचेपी होते त्यामुळं. माझं ऐक, हा फांस लावून घेऊं नकोस. उपासनेंत व्यभिचार चालत नाहीं. एक कला कीं एक संसार ! दोहींची उपासना एकाच वेळीं होणं शक्य नाहीं. सारे धडे घेतले मी, अन् ठरवलं—

**कल्याणीः**—काय ठरवलं ?

**सुंदरः**—आतां जगायचं तर एका कलेसाठीं.

**कल्याणी**:—माझ्यासाठीं ?

**सुंदर**:—माझ्या कलेसाठीं. ज्या कलेच्या पायीं माझी विटंबना झाली, ज्या कलेच्या पायीं विटंबनेपेक्षांही दुःसह असा माझा गौरव झाला, त्या माझ्या एकुलत्या एक कलेसाठीं—कलेच्या व्यापक जीवनासाठीं—एका व्यक्तिसाठीं नव्हे ! जा, कला, बाळ, जा. शक्य तितकी दूर रहा. अगदीं क्षितिजाच्या सीमारेषेवर राहा. तुझ्या प्राप्तीसाठीं शांतपणें पावलं टाकीत मी ती सीमा गांठीन. जा आतां.

[ एक क्षणभरच—कला सुन्न होऊन उभी राहाते आणि नंतर खालील गीत गाऊं लागते ]

**गीत**—( कवि राजा बढेकृत )

**कधीं काळीं दैवयोगें झाली चुकतांच वाट**
**चुकवितां नजरेला चुकीनेंच डोळेभेट**
**रजनीची राजवट खुलवीली तारकांनीं**
**उजळली निराशा ही तुझ्या प्रीतीच्या बोलांनीं**
**मोहरली सहवासें कशी माधवीची वेल**
**विरहानें सहकारा, हाय ! आतां करपेल**
**तुटतांच भेटीगांठी लागलीसे हुरहुर**
**साधायाला प्रीती-सेवा राहूं जीवा दूर दूर**
**निराकार स्वरूपाची केली मनीं सांठवण**
**येऊं द्यावी जिवलगा ! विसरांत आठवण**

[ गीत संपत असतां कला हळुहळू बाहेर जाते. एक क्षणभर तिच्या मागोमाग जाण्याची प्रवृत्ति सुंदरच्या ठायीं उत्पन्न झालेली दिसते—पण दुसऱ्याच क्षणाला तो थांबून उभा राहतो ]

**सुंदर**:—एकटाच—आतां मी एकटाच—माझ्या कलेसाठीं मी एकटाच !

**ॐ तत्सत्**